# मनोगत

इतिहासाचे अध्ययन करताना अनेक देश-विदेश, लढाया, तह, व्यक्ती यांचे दर्शन झाले. अनेक राजकीय, सांस्कृतिक, सामाजिक उलाढाली पाहण्यात आल्या. त्या निमित्ताने मराठ्यांच्या इतिहासातील महाराणी येसूबाई हिचा माझ्या मनावर उमटलेला ठसा मात्र कायम कोरला गेला. माझ्या लिखाणाची स्फूर्तिदेवता महाराणी येसूबाई हिच्या ऋणातून मी कधीच मुक्त होऊ शकणार नाही. हे माहीत असूनही या लिखाणाचा प्रपंच मांडित आहे. मी तिच्यावर काही मोठे संशोधन केले आहे असा माझा दावा नाही. परंतु अनेक संशोधकांनी, लेखकांनी अनेक ठिकाणी तिच्याबद्दल जे गौरवोद्गार काढले आहेत; त्याचं मी फक्त संकलन केले आणि आपल्या मोडक्या तोडक्या शब्दांतून तिला श्रद्धांजली वाहिली आहे. बस्स एवढंच. या कामाला मनापासून आपलेपणाने माझ्या मागे लागून प्रसिद्ध इतिहासकार ती. स्व. स. मा. गर्गे यांनी माझ्याकडून हे लिहून घेतले. नाही तर हे काम माझ्याकडून झाले नसते. माझ्या मोठ्या वन्सं ती. आक्का (डॉ. शकुंतला मिराशी) यांनी वेळोवेळी प्रोत्साहन देऊन काम करायला लावलं. माझा मुलगा चि. अनिल तर ह्या कामाकरता कायम एका पायावर तयार असायचा. माझी मुलगी चि. सौ. माणिक पटवर्धन आणि जावई दिलीप हे कोणत्याही कामाकरता सिद्ध असत. श्री गोपाळराव पटवर्धन (पत्रकार) ह्यांची खूपच मदत झाली. माझ्या मैत्रिणी उषा हस्तक व सौ. कुंदबाला खांडेकर यांनीही अमोल सहाय्य केलं. कॉन्टिनेन्टलचे श्रीयुत अनिरुद्ध कुलकर्णी यांनी लिखाणात काही उणीव राहू नये म्हणून जातीने लक्ष घातले. तरुण इतिहासकार श्री. निनाद बेडेकर यांनी आम्हास उपयुक्त सूचना केल्या. या सगळ्यांच्या ऋणातून फक्त आभार मानून मी मुक्त होऊ इच्छीत नाही. तर यांचा प्रेमळ ठेवा मला कायम मिळावा ही परमेश्वराजवळ प्रार्थना करते. या सगळ्यांनी मला बोलतं लिहितं केलं म्हणून हे घडलं. बाकी इदं न मम।

**मीना मिराशी**

# अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| | प्रस्तावना : स. मा. गर्गे | १ |
| | परिचय | ५ |
| १. | येसूबाईच्या व्यक्तिमत्त्वाची घडण | ८ |
| २. | छत्रपती शिवाजी – येसूबाईवरील प्रभाव | १८ |
| ३. | शिवपुत्र संभाजी | ३१ |
| ४. | छत्रपती संभाजी | ४७ |
| ५. | महाराणी येसूबाई | ५६ |
| ६. | येसूबाईच्या कार्याचे मूल्यमापन | ८३ |
| ७. | येसूबाईची श्रेष्ठता | ९५ |
| ८. | साधन चिकित्सा | १०८ |
| | संदर्भ ग्रंथ | ११७ |
| | परिशिष्टे (१ ते ६) | १२२ - १३० |


□□□

# प्रस्तावना

छत्रपती संभाजी महाराजांची पत्नी येसूबाई हिचे सलग आणि सविस्तर चरित्र लिहिले गेले नाही. मराठ्यांच्या ऐतिहासिक चरित्र लेखनात ही एक त्रुटी राहिलेली होती. ती काही अंशाने श्रीमती मिराशी यांनी या चरित्र लेखनाने भरून काढण्याचा प्रयत्न केला आहे. अर्थात साधनांच्या अभावी अशा चरित्रात अनेक उणीवा राहणे स्वाभाविक आहे. त्यांचे समर्थन करणेही योग्य ठरणार नाही. पण साधनांची त्रुटी लक्षात घेऊन या चरित्र लेखनातील उणिवांची अपरिहार्यताही समजून घ्यावी लागेल. किंबहुना असे म्हणता येईल की, श्रीमती मिराशी यांनी चरित्र लेखनाचा केलेला हा उपक्रम आरंभबिंदू मानून पुढच्या उत्साही तरुण इतिहास संशोधकांनी याबाबतीत उपयुक्त ठरणाऱ्या कागदपत्रांचे संशोधन करावे आणि त्यांच्या आधारे अधिक विस्तृत व साधार चरित्र लिहावे. त्यांच्या प्रयत्नांना काही प्रमाणात प्रोत्साहन मिळाले तरी प्रस्तुत पुस्तकाचे काम झाले असे म्हणता येईल. त्यादृष्टीने येसूबाईंच्या चरित्र लेखनाचा हा आरंभ आहे असे म्हटले तरी वावगे ठरणार नाही.

महाराष्ट्रात इतिहास संशोधनाचे कार्य गेली सव्वाशे वर्षे चालू आहे. आरंभीचा काही काळ सोडला तरी नंतर या क्षेत्रात का. ना. साने, वासुदेवशास्त्री खरे, ग. चि. वाड, वि. का. राजवाडे, द.ब . पारसनीस, रियासतकार यांच्या सारख्या दिग्गजांनी हजारो कागदपत्रे शोधली आणि मराठ्यांचा इतिहास उभा केला. त्यानंतरच्या पिढीतही दत्तोपंत आपटे, शंकरराव जोशी, त्र्यं. शं. शेजवलकर, वि. गो. दिघे, वा. सी. बेंद्रे, मा. वि. गुजर, न. र. फाटक, ग. ह. खरे , पांडुरंग पिसुर्लेकर, सेतु माधवराव पगडी यांसारख्या थोर विद्वानांनी संशोधनाचे फार मोठे कार्य केले. त्यांनी काही ऐतिहासिक घटनांचे महत्त्वाचे तपशील मिळविले व मिळालेल्या साधनांची संगती लावून आपापल्या परीने इतिहास लेखनही केले. त्यामुळे शहाजी राजांपासून दुसऱ्या बाजीरावापर्यंत दोनशे - सव्वादोनशे वर्षांचा इतिहास तत्कालीन कागदपत्रांच्या आधारे मराठी वाचकांना

उपलब्ध झाला. या सर्व कालखंडातील काही स्थळ, काळ आणि व्यक्ती अद्यापही अस्पष्ट दिसतात. अधिक पुराव्यांनीच त्या प्रकाशात येतील. इतिहास संशोधकांची परंपरा अखंड चालूच असते.

महाराणी येसूबाई एका अर्थाने दुर्दैवी म्हणाव्या लागतील. शिवाजी महाराजांसारख्या थोर शककर्त्यांची सून आणि संभाजी महाराजांसारख्या पराक्रमी राजांची पत्नी पण तिला सतत २९ वर्षे मोंगलांच्या कैदेत जीवन कंठावे लागले. त्यातील सतरा वर्षे महाराष्ट्रात बादशहाच्या छावणीबरोबर मुक्काम करावा लागला आणि त्यानंतर १२ वर्षे औरंगजेबाच्या पुत्राबरोबर दिल्ली सारख्या परक्या, अपरिचित ठिकाणी बंदिवास सोसावा लागला. उत्तर भारतातील हवामान मानवणे किंवा न मानवणे याचा त्या बंदिस्त जीवनात प्रश्नच नव्हता. भोवतालच्या बादशाही परिवाराशी जमवून घेणे भागच होते. समाजाचा संपर्क येणेही अवघड आणि भाषा, रीतिरिवाज हे सर्वच परके. अशा स्थितीत येसूबाईंनी सुमारे २९ वर्षे वनवासातच काढली. पण त्याकाळी तरी त्यांच्यापुढे दुसरा पर्यायच नव्हता.

इ. सन १६९० मध्ये रायगडावर येसूबाईंना शत्रुसैन्याने घेरले आणि बंदिवान केले. नंतर इ. स. १७१९ मध्ये शाहूचा पहिला पेशवा बाळाजी विश्वनाथ याने दिल्लीला जाऊन त्यांना महाराष्ट्रात आणले. दुःखात सुख एवढेच की पहिली १७ वर्षे राजपुत्र शाहू त्यांच्या सान्निध्यात होता. पण पुढे इ. स. १७०७ नंतर शेवटची १३ वर्षे येसूबाई आपल्या पुत्रांच्या सहवासालाही अंतरल्या. त्यांना बादशहाच्या बंदिवासातून सुटण्याची संधी आली तीही राजकीय डावपेचाच्या योगायोगानेच म्हणावी लागेल. दिल्ली दरबारात बादशहाच्या सरदारांमध्ये भांडणे सुरू झाली. त्यावेळी बादशहाला दक्षिणेकडे मराठ्यांच्या मैत्रीची गरज भासली. मोंगलांच्या भाऊबंदकीच्या भांडणामध्ये शाहू महाराजांशी मित्रभाव ठेवण्याचा बादशहाने मार्ग स्वीकारला. त्यासाठी त्याने आपल्या विश्वासू सरदारांच्या साहाय्याने प्रथम शाहूशी संधान बांधले. मराठ्यांच्या चौथाई आणि सरदेशमुखीच्या मागण्या मान्य केल्या. शाहू महाराजांनाही बादशहाचा व सुभेदार सय्यद हुसेन यांचा सलोखा हवा होता. दक्षिणेत आपला जम बसवण्यासाठी

सय्यद हुसेनसारखे मोंगल दरबारातील बडे प्रस्थ आपल्या उपयोगी पडेल असे शाहू महाराज आणि बाळाजी विश्वनाथ यांना वाटत होते. शेवटी दोन्ही बाजूंच्या वाटाघाटीतून मराठ्यांच्या चौथाई आणि सरदेशमुखी संबंधाच्या मागण्या मान्य करून सय्यद हुसेनने बादशहा व शाहू महाराज यांच्या दरम्यान करार घडवून आणला. वस्तुत: असा करार म्हणजे मराठ्यांच्या दृष्टीने शककर्ते शिवाजी महाराजांच्या काळातील स्वराज्यनिष्ठेशी अनुकूल नव्हता. कारण त्यासाठी शाहू महाराजांनी बादशहाचे अंकित होण्याचे मान्य करून बादशहाला आवश्यक वाटेल तेव्हा मदत देण्यासाठी फौज ठेवण्याचे मान्य केले. पण त्यावेळची शाहूची काहीशी डळमळीत अवस्था लक्षात घेता बादशहाशी करार करणे आवश्यक होते. या करारात मराठ्यांनी बादशहाला दहा लाख रुपये खंडणी द्यावी असेही एक कलम होते.

पण याच करारात एक अतिशय आनंददायक कलम होते ते विसरता येण्यासारखे नाही. शेवटच्या कलमात म्हटले होते, ''शाहूची मातोश्री, कुटुंब, दासीपुत्र मदनसिंग वगैरे दिल्लीस बादशहाचे कबजात आहेत त्यांना सोडून द्यावे व स्वदेशी पावते करावे.'' महाराणी येसूबाईंच्या सुटकेसंबंधीचे हे कलम इतिहासात आणि राजघराण्यांच्या आनंदात निश्चितच अपूर्व म्हणावे लागेल. येसूबाईना इ.स. १६६९ मध्ये रायगड किल्ल्यावर बादशहाच्या फौजेने कैद केले, तेव्हापासून त्या मोंगलांच्या कैदेतच होत्या, याचा उल्लेख वर केलाच आहे. शेवटी वरील कराराप्रमाणे त्यांची सुटका झाली आणि ''मातोश्रीसह बाळाजी विश्वनाथ ता. ४ जुलै १७१९ रोजी साताऱ्याला येऊन दाखल झाले. महाराजांच्या भेटी झाल्या. मुले, माणसे भेटवली, मातोश्रींची भेट झाली यावरून संतोषी होऊन कृतार्थ झाले.'' ( खंड ४)

तीन दशके एवढा प्रदीर्घ काळ राजघराण्यातल्या एखाद्या स्त्रीला शत्रूच्या गोटात जीवन कंठण्याचा खडतर प्रसंग इतिहासात कोणावर आला असेल असे वाटत नाही. त्यामुळेच येसूबाईंच्या परत येण्याचा मराठमंडळाला किती मोठा आनंद झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. कोल्हापूरच्या संभाजी राजांनी

शाहू महाराजांना मुद्दाम पत्र पाठवून येसूबाई संबंधीचा आपला आदरभाव आणि आनंद व्यक्त केला होता.

येसूबाई राजमाता म्हणून आयुष्याच्या शेवटी साताऱ्याला राहू लागल्या. दिल्लीवरून परत आल्यावर त्या बारा वर्षे शांतपणे व समाधानाने जगल्या. त्यांनी कोणत्याही राजकीय सल्लामसलतीत किंवा हालचालीत भाग घेतल्याचा उल्लेख आढळत नाही. त्यांच्या शेवटच्या दिवसांत फक्त एकच महत्त्वाची घटना त्यांच्या मध्यस्थीने घडली व ती घटना सातारा व कोल्हापूर या दोन्ही राज्यांना फार उपकारक ठरली. मराठ्यांच्या इतिहासातही या घटनेला भाऊबंदकीच्या मर्यादेत अर्थ आहे. ही घटना म्हणजे शाहू महाराज व कोल्हापूरचे संभाजी यांच्या दरम्यान झालेला वारणेचा तह. प्रत्यक्ष तहाच्यावेळी येसूबाई जिवंत नसाव्यात पण असा तह घडवून आणण्यासाठी त्यांनी आरंभीच्या वाटाघाटीत दोन्ही राजघराण्यांत समेट करण्याची मध्यस्थी केली होती असे उल्लेख मात्र ऐतिहासिक कागदपत्रात सापडतात.

श्रीमती मिराशी यांनी आपल्या परीने प्रयत्न करून येसूबाईचे चरित्र लिहिले आहे. त्यात आणखी मोठी भर घालता येण्यासारखी आहे असे वर म्हटलेच आहे, त्यादृष्टीने त्यांनी आणखी इतिहास साधनांचा मागोवा घेऊन या चरित्राचा विस्तार करावा अशीच कोणीही अपेक्षा करील. त्यामुळे या चरित्र लेखनातील काही ठिकाणी झालेला द्विरुक्तीचा भाग काढून टाकता येईल व आवश्यक तेथे त्याचा विस्तारपूर्वक काही भाग वाढविताही येईल. साधनांच्या दुर्मिळतेमुळे हे काम खूप अवघड आहे याची कल्पना आहे. पण त्यांनी प्रयत्न चालू ठेवले तर त्यांना या प्रयत्नात यश लाभेल अशी सदिच्छा व्यक्त करतो.

समाजविज्ञान कोष
१२०५/४ शिवाजीनगर, पुणे-४

- स. मा. गर्गे

# -परिचय-

मध्ययुगीन कालखंडात, विशेषत: मराठ्यांच्या इतिहासात स्त्रीच्या कर्तृत्वाला फारसे क्षेत्र उपलब्ध नव्हते. त्यामुळे स्वकर्तृत्वाच्या बळावर काही स्त्रियांनी ही कोंडी फोडली तरी अशा सर्व स्त्रियांची नोंद इतिहासाने घेतली आहे असे नाही. येसूबाई ही या दुर्दैवी स्त्रियांपैकीच एक आहे.

सुविद्य, सुसंस्कृत, कर्तव्यदक्ष, राजकारण-कुशल अशा महाराणी येसूबाईने १६८० ते १७३० या मराठी राज्याच्या कसोटीच्या काळात अतिशय महत्त्वाचे योगदान केले आहे.

शिर्के भोसले संबंध - शिवाजी महाराजांच्या राज्यविस्ताराच्या कार्यात शृंगारपूरच्या शिर्के (पिलाजीराव) यांची कन्या येसूबाई हिचा विवाह शिवपुत्र संभाजी याच्याशी अंदाजे इ.स.१६६१ ते ६५ च्या दरम्यान संपन्न झाला. पूर्वीच्या काळी विवाहाच्या वेळी मुली लहान असत. तेव्हा मुलीच्या बरोबर पाठराखी म्हणून काही माणसे माहेराहून पाठवत असत. बहुधा यांत स्त्रियांचाच समावेश असे. परंतु येसूबाईंबरोबर तिच्या माहेराहून दोन विद्वान पंडित पाठवण्यात आले. ते रघुनाथ पंडित आणि केशवभट होत. त्याकाळी पराक्रमी आणि सुसंस्कृत म्हणून प्रसिद्धीला आलेली शिर्के आणि भोसले ही दोन घराणी या विवाहाने एकत्र आली. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रावर विशेषत: मराठ्यांच्या राज्यावर अस्मानी संकट कोसळले. औरंगजेबाने संपूर्ण दक्षिण जिंकण्याच्या उद्देशाने सर्व शक्तीनिशी दक्षिणेवर आक्रमण केले. शिवरायांच्या स्वराज्य स्थापने-पासून संपूर्ण कारकिर्दीची प्रत्यक्ष साक्षीदार असलेली येसूबाई ही समर्थपणे या संकटाला सामोरी गेली. अंतर्गत राज्यकारभार स्वत:कडे घेऊन येसूबाईने संभाजीला राज्यरक्षणाकरता प्रवृत्त केले. संभाजीच्या कारकिर्दीच्या पहिल्या काही दिवसांत स्वकीयांशी वितुष्ट निर्माण झाले होते. त्या सगळ्यांचे स्वत:च्या शांत आणि समजूतदार स्वभावाने येसूबाईने निर्मूलन केले आणि आपसांतील बेबनाव मिटवून स्वकीयांचा राज्यरक्षणाकरता उपयोग करून घेतला. संभाजीच्या कोपिष्ट स्वभावाची कल्पना असल्याने येसूबाईने राज्यकारभाराची धुरा मोठ्या विश्वासाने स्वत:च्या हातात घेतली. त्याकरता तिच्या नावाचा शिक्काही ''श्री सखी राज्ञी

जयति'' असा करवून घेण्यात आला.

इ.स. १६८९ मध्ये संभाजीच्या क्रूर वधाने निर्माण झालेल्या अराजक परिस्थितीतून राज्याला वाचविण्याकरता येसूबाईने आपले वैयक्तिक दु:ख बाजूला ठेवले. येसूबाई मोठ्या निर्धाराने पतिनिधनाचे दु:ख पापणीआड दडवून मराठी राज्यरक्षणाकरता सिद्ध झाली.

२३ मार्च १६८९ ला झुल्फिकारखानाने रायगडाला वेढा घातला. त्यावेळी राजारामासह सगळ्या राजप्रतिनिधींना एकत्र बोलावून राज्यरक्षणाकरता तिने दिलेला दूरगामी सल्ला हा अतिशय महत्त्वाचा आहे. राजाराम व शाहू राज्याचे वारस एकत्र शत्रूच्या हाती सापडू नयेत म्हणून तिने स्वत:च्या मुलाला म्हणजे शाहूला आपल्या जवळ ठेवून राजारामाला रायगड सोडून जाण्यास भाग पाडले. बाहेरून रायगडाला मदत करा, प्रसंगी जिंजीकडे जा, असे तिने सुचविले. स्वत: रणरागिणी येसूबाई रायगडाच्या बचावाकरता सिद्ध झाली.

शेवटी रायगड आता लढणे शक्य नाही हे पाहिल्यावर तिने मोगलांच्या छावणीत स्वत:च्या ७-८ वर्षांच्या मुलासह प्रवेश केला. ज्या सिंहाने आपल्या पतीची खांडोळी करुन त्याचा वध केला, त्या सिंहाच्या गुहेत ही अद्वितीय स्त्री प्रवेश करती झाली.

आयुष्यातील उमेदीची ३० वर्षे मोगल कैदेत येसूबाईने घालविली. त्यात अनेक अडचणी आल्या. त्या तिने मोठ्या धैर्याने सोडविल्या. या तिच्या आत्मबलिदानाला तोड नाही. येसूबाईवर बलात्कार झाला असा आरोपही करण्यात आला. परंतु त्या अग्निदिव्यातूनही ही सोनपुतळी निष्कलंक आणि अधिक तेजस्वी होऊन बाहेर आली.

इ.स. १७१९ च्या सुमाराला ही दिल्लीहून दक्षिणेत परत आली. दक्षिणेत मराठी राज्याची झालेली सातारा, कोल्हापूर अशी शकले तिने पाहिली. आपसांतील दुहीमुळे परकीय शत्रूंचे कसे फावते याचा धडा शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीपासून पाहत आल्यामुळे तिने कोल्हापूरचे संभाजीराजे आणि शाहू यांच्यात १७३० च्या सुमाराला वारणा येथे मैत्रीचा तह घडवून आणला.

यानंतर थोडेच दिवसांत तिचे देहावसान झाले. त्याचा उल्लेख

कोल्हापूरच्या संभाजीच्या पत्रावरून कळतो. साताऱ्याजवळील माहुली या क्षेत्री तिचे दहन करण्यात आले. आजही माहुलीच्या नदीकाठी एका चौथऱ्यावर तिची समाधी म्हणून दाखवतात. परंतु त्यावर 'नाही चिरा नाही पणती !'.

अशी ही महाराणी येसूबाई पिलाजी शिर्केची कन्या, शिवाजीमहाराजांची स्नुषा, संभाजी राजाची पत्नी, राजारामाची भावजय, शाहूची मातोश्री, अशा या दुय्यम स्थानांवरूनच ओळखली जाते. इतिहासात अजून तिच्या जन्माची नोंद नाही, मृत्यूची दाद नाही. तिच्या कर्तृत्वाची, ऐतिहासिक योगदानाची माहिती नाही. हे पाहिल्यानंतर या दुर्लक्षित महाराणीच्या कार्याचा एकत्र आढावा ऐतिहासिक दृष्ट्या घ्यावा म्हणून हा अल्पसा प्रयत्न केला आहे.

दिल्लीला १९९४ मध्ये जागतिक मराठी परिषद भरली होती. त्यावेळी आजपर्यंत दिल्लीला किती व्यक्ती कोणकोणत्या विभागात शैक्षणिक, राजकीय, सामाजिक कार्याकरता आल्या त्या मंडळींची नोंद त्यांच्या स्मरणिकेत केली गेली. त्यांत 'मुक्काम देहली' या श्रीधर जोशी यांनी लिहिलेल्या लेखात महाराणी येसूबाई दिल्लीला गेली त्यावेळेपासून परत आली तोपर्यंतचा थोडक्यात आढावा घेतलेला आहे. महाराष्ट्रातून दिल्लीला गेलेली पहिली मराठी महिला असा तिचा उल्लेख आहे. 'दिल्ली बहोत दूर है' हे वचन आजच्या यंत्रयुगाने जरी कालबाह्य ठरवले असले तरी इ.स. सतराव्या-अठराव्या शतकात ही गोष्ट नक्कीच उल्लेखनीय समजावी लागेल. दिल्लीकरांनी येसूबाईचा निदान उल्लेख तरी करावा आणि महाराष्ट्रातील लोकांना तिची काहीच माहिती नसावी हे योग्य नव्हे ! त्याकरता येसूबाईच्या कर्तृत्वाची, कार्याची, साहित्यिक गुणांची, सहनशीलतेची, धैर्याची ओळख व्हावी म्हणून हा प्रपंच मांडला आहे. येसूबाईंबद्दल अत्यल्प ऐतिहासिक साधनसामग्री आहे याची जाणीव असूनही हाती आलेल्या महाराणी येसूबाई बद्दलच्या ऐतिहासिक पुराव्याच्या आधारे तिचा जीवनपट वाचकांसमोर ठेवून तिच्यावर झालेला अन्याय काही अंशाने भरून काढावा, एक उपेक्षित तेजस्वी व्यक्तिमत्त्व अक्षराने अमर करावे या उद्देशाने प्रेरित होऊन लिखाण केले आहे.

: १ :

# येसूबाईच्या व्यक्तिमत्त्वाची घडण

मानवी जीवन हे तो राहत असलेल्या सामाजिक परिस्थितीतून घडत असते. समाजातील धार्मिक, सांस्कृतिक, राजकीय, आर्थिक निरीक्षणातून त्या व्यक्तीची घडण होत असते. मात्र या परिस्थितीचे आकलन ती व्यक्ती कसे आणि कशा स्वरूपात करते हे त्या व्यक्तीवर अवलंबून आहे. आनुवंशिकतेचाही परिणाम त्या व्यक्तीवर अपरिहार्यपणे होत असतो. म्हणजेच माणसाचे व्यक्तिमत्त्व हे समाजात घडणाऱ्या घटना आणि आनुवंशिक रक्तगुणातून साकार होत असते. इ.स. १६ व्या आणि १७ व्या शतकापर्यंत स्त्रियांचे विवाह सातव्या-आठव्या वर्षी होत असत. त्यामुळे साहजिकच तिचे शिक्षण, तिच्यावर होणारे संस्कार हे माहेराप्रमाणे सासरीही तिच्या व्यक्तिमत्त्व विकासाला कारणीभूत ठरत.

इतिहासाच्या माध्यमातून येसूबाईच्या चरित्राचा मागोवा घेताना तिच्या सुसंस्कृत माहेराप्रमाणेच सासरच्या राजकीय परिस्थितीचा व स्वतंत्र राज्याच्या कल्पनेचा तिच्यावर होत गेलेला परिणाम हा पाहणे अतिशय महत्त्वाचे ठरते. त्यादृष्टीने माहेर शिर्के आणि सासर भोसले या येसूबाईशी निगडित असलेल्या दोन वंशांची (घराण्यांची) माहिती, त्याबद्दलच्या ऐतिहासिक पुराव्यावरून समजून घेणे हे येसूबाईच्या व्यक्तिमत्त्व विकासाच्या दृष्टीने अतिशय आवश्यक आहे.

**येसूबाईचे माहेर शिर्के**-यांच्या घराण्यातील सूर्यवंशी रामराजाच्या कुळातील अस्सल क्षत्रिय असा शिर्के यांचा उल्लेख केला जातो.

"त्रिप्रवशान्वित व वैयास्प्र गो गोत्पन्नोहं"

असा उल्लेख शिर्के यांचा असून त्यांना वेदाच्या आज्ञेप्रमाणे यजुर्वेदाचा अधिकार आहे. उत्तरेकडून शके ७०५ मध्ये शिर्के दक्षिणेत आले. रायगडावर फौज जमवून त्यांनी वास्तव्य केले. व्रजपाळ हा शिर्के घराण्याचा मूळ पुरुष. मुसेखोरे येथील शिरकाई देवीची स्थापना याने शिरकावली या गावी केली. त्याला

शिरकाण टप्पा असे म्हणतात. पूर्वी शिर्के यांचे आडनाव कूटर असे होते. ते आता शिर्के म्हणून समजले जाऊ लागले. पुढे व्रजपाळाच्या वंशजांनी मुसलमानांशी प्रखर लढा देऊन कोकण प्रांतात आपली घराणी प्रस्थापित केली. शिर्के घराण्याचे वास्तव्य बरीच वर्षे कोकण प्रांतात होते. पंधराव्या शतकाच्या पूर्वार्धात सरंजामदारांच्या संघर्षाच्या निमित्ताने शिर्के यांचे नाव प्रसिद्धीस आले. कोकणपट्टीवरील संकीसरचा किल्ला (संगमेश्वर) शिर्के यांनी मुसलमानांशी लढण्याकरता सुसज्ज केला होता. इ.स. १४२९ ते १४६९ पर्यंत संगमेश्वर व खेळणा याठिकाणी शिर्के यांनी मुसलमानांशी प्रखर लढा दिला. परंतु इ.स. १४६९ नंतर शिर्के यांचे कोकणातून स्थलांतर झाले.

शिर्के देशावर आले आणि जावळी येथे स्थायिक झाले. मोरे यांनी जावळीवर कब्जा केल्यानंतर शिर्के तळकोकणात शृंगारपूर येथे सुर्वे यांच्या आश्रयाला आले. पिलाजी शिर्के (येसूबाईचे वडील) सुर्वे यांचे कारभारी म्हणून काम पाहू लागले. सुर्वे यांनी आपली मुलगी पिलाजी यांना देऊन सोयरीक केली आणि विजापूरच्या बादशहाकडून दाभोळ येथील मामले रायरीची देशमुखी शिर्के यांना देवविली.

शिर्के यांचे घराणे छत्रपतींच्या निकट आप्तांपैकी होते. शहाजी भोसल्यांप्रमाणे पिलाजी शिर्के यांच्या पदरीही अनेक विद्वान मंडळी होती. संभाजी-येसूबाई यांच्या विवाहामुळे शिर्के व भोसले दोन्ही सुविद्य घराणी एकत्र आली. या दोन्ही घराण्यांचे आनुवंशिक संस्कार येसूबाईवर लहानपणापासून झाल्यामुळे ती सुविद्य, सुसंस्कृत व कर्तृत्ववान झाली.

## वंशावळी

छत्रपतींच्या घराण्याशी शिर्के यांचा आपसांत संबंध होता. ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळीत शिर्के यांची वंशावळ दिलेली आहे.






**येसूबाईचे सासर भोसले-**

१४ व्या शतकाच्या मध्यंतरात दिल्लीतील सुलतानशाहीत अराजकता निर्माण झाली. १३३४ मध्ये हसन गंगू जाफरखान हा दक्षिणेत आला. त्याच्याबरोबर शिसोदिया वंशाचे दोन तरुण आले. बहामनी राज्य स्थापनेला मदत केल्याबद्दल त्या दोघांना दौलताबादची जहागीर व सरदारी देण्यात आली. त्यांची नावे सज्जनसिंह व दिलीपसिंह अशी होती. भोसले कुळाचे मूळ पुरुष म्हणून यांना समजण्यात येते. बहामनी वजीर महंमद गवान यांच्याबरोबर इ.स. १४६९ मध्ये कोकणातील शिर्के यांच्यावरील स्वारीत सज्जनसिंह व दिलीपसिंह यांनी शिर्के यांचा पराभव करुन तो प्रदेश महंमद गवानला जिंकून दिला.

**मालोजी -**

भोसले घराण्याच्या उत्कर्षाचा पाया मालोजीने घातला. जयराम पिंडे यांच्या 'राधामाधव विलास चंपू' यात मालोजीचा उल्लेख मकरंद असा श्रेष्ठत्वदर्शक उपपद त्यांच्या नावापुढे लावून केलेला आहे. औरंगाबाद जवळील वेरुळ - घृष्णेश्वराच्या देवळाचा जीर्णोद्धार मालोजीने केला. ''दास मालोजी बाबाजी व विठोजी बाबाजी भोसले.'' असा आपल्या व भावाच्या नावे वेरुळला शिलालेख कोरविला. दौलताबादेजवळील वेरुळ, देहाडी व कन्नड हे तीन परगणे मालोजीने स्वपराक्रमाने मिळविले. इ.स. १५७७ ते १६०६ हा मालोजीचा कार्यकाळ आहे. सभासद बखरीत मालोजीच्या कार्याचा गौरव पुढीलप्रमाणे आढळतो.

''राजियाचे आजे राजश्री मालोजी राजे व विठोजी राजे भोसले हे निजामशाही वजीर दौलताकडून तोलदारीने होते. त्यांची निष्ठा श्री शंभूमहादेव यांचे भजनी बहुत होती. त्यास शिखरी यात्रा चैत्रमासी भरते. पाचसात लक्ष माणसे मिळतात. पाणियाचे बहुत संकट, उदक नाही, तीन कोसांवरून उदक आणतात. लोक श्रमी बहुत होतात. म्हणून राजेश्री मालोजी राजे यांनी तेथे जागा पाहून तळे थोर बांधले, सर्वत्र लोकांस उदक कार्यास येई असे केले. अपरिमित खर्च केले.''

**शहाजी राजे -**

मालोजीच्या मृत्यूच्या वेळी त्याचा मुलगा शहाजी हा ६-७ वर्षांचा होता. लखुजी जाधवासारख्या निजामशाहीतील मातब्बर सरदाराच्या मुलीशी म्हणजे जिजाबाईशी शहाजीचा विवाह झाला होता. इ.स. १६२४ च्या भातवडीच्या लढाईपर्यंत निजामशाहीतील प्रमुख मुत्सद्दी मलीकंबर याच्याशी शहाजीचे

जिव्हाळ्याचे संबंध होते. शहाजीला अदिलशहाकडून पुणे, सुपे हे प्रदेश जहागीर म्हणून मिळाले होते. शहाजीने स्वपराक्रमाने स्वपक्ष निर्माण केला होता. निजामशाही व अदिलशाही व मोगलाई ह्या त्या काळातील प्रसिद्ध शाह्यांच्यापेक्षा शहाजीची फौज जास्त कर्तबगार व कार्यक्षम होती. कर्नाटकात शहाजीने आपले पूर्णपणे सत्ताधारी राज्य निर्माण केले होते. राज्यात होणारे स्त्रियांवरील अत्याचार, शेठ - सावकारांकडून होणारी गरिबांची लुबाडणूक याला शहाजीने आळा घातला. परदेशी लोकांकडून उत्तम प्रकारची हत्यारे व बंदुका जमवून शहाजीने आपले सैन्य सुसज्ज ठेवले होते. महाराष्ट्रातील अनेक किल्ल्यांवर शहाजीचा मोठा सरंजाम व उत्तम व्यवस्था होती. स्वराज्याची मूळ कल्पना शहाजीचीच होती. सरदेसाईंच्या मते, ''शिवाजीला जर राज्यसंस्थापक म्हणायचे असेल तर शहाजीला राज्य संकल्पक असे पद देण्यास हरकत नाही.'' शहाजीचा मोठा ग्रंथसंग्रह होता. स्वत: शहाजी संस्कृतचे उत्तम जाणकार असल्यामुळे जयराम पिंडे लिखित ''राधामाधव विलासचपू'' यावर समस्या घालणे व संस्कृतमध्ये संभाषण करणे इतकी पारंगतता त्यांची होती. पुढे शिवाजी महाराजांना उपयोगी आलेली दादोजी कोंडदेव, पानसंबळ रोझेकर, जेधे, बांदल ही मंडळी शहाजीच्या तालमीत तयार झालेली होती. म्हणजेच शिवाजीच्या राज्यस्थापनेच्या कार्याला शहाजीच्या कर्तृत्वाची पार्श्वभूमी लाभली होती.



**शिर्के-भोसले संबंध-**

शिर्के आणि भोसले यांच्या परस्पर संबंधाविषयी विस्ताराने माहिती असणे येसूबाईचा दोन्ही घराण्यांशी संबंध असल्यामुळे आवश्यक आहे. शिवाजी महाराजांच्या वेळेपासून शिर्क्यांशी जडलेले नाते नंतरच्या काळात कांही कटू प्रसंगांमुळे दुरावले. परंतु येसूबाईच्या प्रसंगावधानामुळे त्यांच्यात पुन्हा एकोपा निर्माण झाला व त्याचा फायदा मराठी राज्याला झालेला दिसतो. त्यादृष्टीने १६६५ पासून ते १७०० राजारामाच्या मृत्यूपर्यंत या दोन घराण्यांनी मराठी राज्याकरता कसे योगदान केले ते जाणून घेणे महत्त्वाचे आहे. येसूबाईच्या व्यक्तिमत्त्व विकासाच्या दृष्टीने दोन्ही घराण्यांचे तिच्यावर झालेले संस्कार लक्षात घ्यावयास हवेत. मूळ विषयापासून थोडे वेगळे विषयांतर होत असल्याची जाणीव असूनही जाणीवपूर्वक दोन्ही घराण्यांचे संबंध अभ्यासणे येसूबाईच्या चरित्राच्या दृष्टीने योग्य ठरेल.

**पूर्वपीठिका** - (इ.स. १६६५ ते १७००)

शिवाजी महाराजांची पत्नी सोयराबाई ही शिर्के घराण्यातील होती, असे ग्रँट डफच्या मराठ्यांच्या बखरीत व शिवप्रतापात म्हटले आहे. उलट दादाजीने शिवाजीचे लग्न (पहिले) शिर्क्यांच्या मुलीशी शके १५६२ वि.सं. शुद्ध पंचमीस केल्याचे शिवदिग्विजय बखर सांगते. ही तारीख एप्रिल १६४० येते (बेंद्रे वा.सि.) प्रचलित समजुतीनुसार शिवाजी महाराजांची प्रथम पत्नी सईबाई निंबाळकर घराण्यातील तर सोयराबाई मोहिते घराण्यातील होती. (मावजी व पारसनीस इतिहास संग्रह १९१३, साने का.ना.) संभाजीची पत्नी येसूबाई ही शिर्के घराण्यातील. शिवाजीच्या मृत्यूनंतरही भोसले-शिर्के संबंध बराच काळपर्यंत चालू होता. शाहू छत्रपतींची एक पत्नी राणूबाई उर्फ सकवारबाई ही शिर्के घराण्यातील, शाहू नंतरच्या राजारामाची पत्नी आनंदीबाई (माईसाहेब) व प्रतापसिंहाची दुसरी राणी व शहाजीची सगुणाबाई ह्या दोघीही शिर्के कुळातील होत्या. आपल्या राज्याच्या संरक्षणार्थ सगुणाबाईने राणी व्हिक्टोरिया हिला अर्ज केला होता.

**शिवाजी-शिर्के**

२६ जानेवारी १६५६ रोजी शिवाजी महाराजांनी मोरे यांचा पराभव

करून जावळी सर केली. त्यानंतर पाच वर्षांनी २६ एप्रिलला महाराज शृंगारपुरावर चालून गेले. कारण पालवणचे दळवी आणि शृंगारपूरचे सुर्वे राजे महाराजांच्या शत्रूला मदत करीत. पन्हाळ्याच्या वेढ्यात महाराज अडकले असताना या लोकांनी सिद्धी जोहारला मदत केली होती. शक्यतोवर स्वकीयांना सामोपचाराने संधी देण्याचे राजांचे धोरण होते. परंतु विजापूरकरांच्या चिथावणीने राजे सुर्वे यांनी संगमेश्वराला ठेवलेल्या राजांच्या फौजांना घेरले. तानाजी मालुसरे या राजांच्या निष्ठावंत सेवकाने चांगली लढत दिली. सूर्यराव सुर्वे पळून गेले. इ.स.१६६१ ला सुर्व्यांवर चाल करून महाराजांनी त्यांना घेरले. सुर्वे पळून कुडाळच्या सावंताकडे गेले. आता महाराजांना सुर्वे व कुडाळचे सावंत या दोघांचा समाचार घेणे भाग होते. महाराजांनी सुर्वे यांचे कारभारी शिर्के यांच्याशी संगनमत करून आपला कार्यभाग साधला. सभासद बखरीत म्हटले आहे, ''जावळी काबीज केली सिवतर खोरीयात बाबाजी राऊ म्हणून पुंड होता तोही कैद करून त्याचे डोळे काढले. पुढे सुर्वे राज्य करीत होते. त्याजवर चालोन गेले. शृंगारपूर घेतले. सुर्वे पळोन देशांतरास गेले. त्यांचे कारभारी शिर्के होते. त्यांशी भेद करोन हस्तगत केले. त्यासी महाल मुलूख देऊन त्यांची कन्या राजीयाने आपल्या पुत्रास केली. याप्रकारे जावलीचे राज्य व शृंगारपूरचे राज्य ऐशी दोन राज्ये काबीज केली. या आप्तसंबंधामुळे शिर्के स्वराज्याच्या सेवेत कायम राहिले. महाराजांनी नंतर लखम सावंताकडे बोलणी करण्याकरता पिलाजी शिर्के यांना पाठविले.'' ''लखम सावंत पो । कुडाळ याही भिमगड फौडे प्रसंगी फिसाद केली. त्याकरता शिवाजी महाराजांनी पिलाजी राजे शिर्के यास आज्ञा करून लखम सावंताकडे पाठविले. ते जाऊन कितेक प्रकारे बोलोन त्याचा शक तोडीत आणभाक क्रिया देऊन लखम सावंताचा तह करून त्यास त्याचे वतनावरी ठेवले. तदुपर पिलाजी शिर्क्यांनी अर्ज केला. जे मामले दाभोळच्या देशमुखीचे वतन आदिलशाहीनी आपणास मऱ्हामत केले. त्याचा भोगवटा झाला नाही. ते वतन आपले आपणास देऊन चालवावे, यावरून स्वामींनी आज्ञा केली की, आपल्या राज्यात वतने द्यावयाची दंडक नाही. परंतु तुम्ही स्वामीकार्य केले व सोयरीक ही तुम्हासी जाली तरी. चि.राजकुवर बाईस पुत्र होईल तेव्हा ते देशमुखी वतन आपण तुम्हास देऊ.'' तथापि शिवाजी महाराजांच्या हयातीत हे घडून आले नाही. पिलाजीरावाच्या मुलास - गणोजीस महाराजांनी आपली कन्या

राजकुवरबाई देऊन भोसले शिर्के घराण्यांचे संबंध दृढतर केले. शिर्के यांनी महाराजांबरोबर स्वराज्याची जबाबदारी स्वीकारली. कवी परमानंद म्हणतो,

''ततः कतिपयाहोभिः सूर्यराज समान्विताः ।
शिरस्का शिवराजेन स्वायताः सेवकीकृताः ॥''

**संभाजी- शिर्के-**

पुढे येसूबाईशी झालेल्या विवाहामुळे शिर्के यांच्याशी संभाजीचा नातेसंबंध जडला. संभाजी थोडा मोठा झाल्यावर राज्याभिषेकानंतर राज्याची जबाबदारी महाराजांनी हळूहळू संभाजीवर टाकायला सुरुवात केली. पिलाजी शिर्के संभाजीचे सासरे होते. ते राजकारणातील अनुभवी असल्याने संभाजीची जबाबदारी त्यांच्यावर सोपविण्यात आली. २३ मे १६७३ ला इंग्रज वकील टॉमस बिकल्सन हा महाराजांच्या गैरहजेरीत रायगडावर आला असताना इंग्रजांशी तह करण्याचे अधिकार पिलाजीला दिले असल्याने त्याने अननुभवी संभाजीला हाताशी धरून तह केला. म्हणजेच महाराजांच्या मृत्यूपर्यंत शिर्क्यांचे राजांशी संबंध सलोख्याचे होते.

महाराजांच्या मृत्यूनंतर राज्यात अनेक कट-कारस्थाने झाली. यावेळी हंबीररावाबरोबर पिलाजी शिर्के यांच्या सल्ल्याला मान दिला जात असे. संभाजीसमोर मोरोपंत, अण्णाजी दत्तो वगैरेंना कैद करवून नेले असता हंबीरराव मोहिते, हरजी महाडीक, पिलाजी शिर्के, गणोजी शिर्के वगैरेंच्या मध्यस्थीने संभाजीने मोरोपंतादी सर्वांना सोडले.

संभाजी कलुषाच्या सल्ल्याने राज्यकारभार करू लागल्यामुळे, साहजिकच पिलाजी शिर्के - येसूबाईचे वडील शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीपासून मानाने व कर्तबगारीने काम करणारे महाराजांचे आप्त संबंधी संतप्त झाले. गणोजी शिर्के संभाजीचे मेहुणे यांचाही स्वाभिमान दुखावला गेला. येसूबाईसमोर हा नवीनच पेच निर्माण झाला.

हळूहळू शिर्के मंडळी संभाजीला सोडून मोगलांकडे जाऊ लागली. इ.स. १६८२ मध्ये येसूबाईचा चुलतभाऊ कान्होजी हा मोगलांना मिळाला. मासिरे आलमागिरीतील नोंद पुढीलप्रमाणे आढळते, ''कान्होजी दखनी याने बादशहाची भेट घेतली. त्याला पाच हजारी आणि पाचहजार स्वारांचा मनसबदार करण्यात

आले.'' गणोजी शिर्के वगैरे मंडळी इ.स. १६८८ पर्यंत संभाजीपाशी होती.

राज्याच्या नाशाला व आप्तस्वकीयांच्या हत्याकांडाला कलुषा कारणीभूत आहे असे मानून इ.स. १६८८ मध्ये शिर्क्यांनी कलुषावर स्वारी केली. ''कलुषाने संभाजीला पाचारण केले. लोक नामी, माणसे कर्ती, चहुकडे चार गेली. पिलाजी व तानाजी शिर्के, गणोजी शिर्के हे महाराजांचे आप्त याजी राजा वेडा जाला, कबजीने वश केले, राज्य बुडते, त्याअर्थी हिच्याकडून शिवाजी राजे, शिर्के यांचे भाचे यास घेऊन राज्यावर बसवावे. राजाराम काढून त्याचे हाते कारभार चालवून राज्य रक्षावे ऐसे राजकारण केले, ते संभाजी महाराज यास समजले, फुटले. आधीच क्रूर मर्जी, यात याजपासून अंतर ऐसे समजले. तेव्हा इतराजी केली, घरी जप्ती पाठविली, (घरे) फुटली, जाळली. एक दोन शिर्के सापडले ते मारिले. शिर्के जेथे असतील तितके मारावे ऐशी आज्ञा करून शिरकाण करविले ते समधी दौलतराव शिर्के तितके कुटुंबसुद्धा हबसाणात गेले. चहूकडे चार जाऊन मोगलाईत चाकऱ्या करू लागले. मोगल मराठी साम्राज्यात तीन मार्गाने घुसत असता शिर्के यांचे बंड व्हावे ही दुर्दैवाची गोष्ट होय. गणोजी शिर्के मोगलांकडे गेला तरी त्याने स्वराज्याकडे पाठ फिरविली नव्हती. जिंजीला मराठ्यांचा पराभव झाल्यानंतर सन १६९८ मध्ये राजारामाच्या बायका ताराबाई, राजसबाई व अंबिकाबाई व त्यांची मुले यांना गणोजी शिर्के यांनीच कैदेतून निसटण्यास मदत केली. गणोजीने खानाला राजारामाच्या बायकांना सोडून देण्यासंबंधीचा पत्रव्यवहारांत खालील उल्लेख आढळतो. खानाने शिर्क्यांचे म्हणणे मान्य केले. शिर्के म्हणाले, ''ठीक आहे पण गडावर जे आमचे सोयरे धायरे आहेत, प्रत्यक्ष आमच्या बहिणी आहेत. सर्वांची अब्रू सारखीच असते. जे आप्त असतील त्यांच्या कुटुंबियांना आम्ही ताब्यात घेऊ, बाकीच्या लोकांना आपण पार करावे.'' दाऊदखान आणि सर्जा खान यांनीही शिर्क्यांच्या म्हणण्याला पाठिंबा दिला. त्यानंतर खानाने तह केला आणि गडावरील लोकांना खाली उतरण्याचा हुकूम सोडला. चिटणीस बखरीत पृ. १९ वर हा उल्लेख आढळतो.

संभाजीकडून दुखावलेल्या आपल्या नातलगांना वेळोवेळी स्वराज्याच्या मदतीकरता आपल्या बाजूला वळवून घेण्याचे मोठे काम येसूबाईनेच केले यात संशय नाही.

यासंबंधीचे एक उदाहरण इतिहास संग्रह वर्ष ३ अंक २ पान ५८ यात पुढील हकीकत दिली आहे.

''चंद्रसेन जाधव याची बाळाजी विश्वनाथ याशी चुरस लागून बाळाजीस चंद्रसेनाने पांडवगड किल्ल्याजवळ आपले स्वारानिशी जाधव यमाजी, धुमाळ या दोघा शिलेदारांनी इरेस चढून बाळाजी व त्याची मुले माणसे यास किल्ल्याचे माचीत नेऊन सुरक्षित घातले व जाबामर्दीची शर्थ करून त्यास वाचविले.'' ''बडोद्यास १८९७ त.रा. तानाजीराव जाधव यांनी वाडीकर जाधव याचा वृत्तांत छापला आहे. त्यांत पृष्ठ ५ वर वरील इमानी शिलेदाराच्या जोडीपैकी धुमाळ याचे नाव नाथाजीराव असे दिले आहे.

या स्वारीत बाळाजीस म्हणजे परंपरेने शाहू महाराजाचे पक्षास त्यांनी मदत केली. त्या आसामीत कान्होजीराव शिर्के होते. ही माहिती नवीनच उपलब्ध होत आहे. त्या कान्होजीच्या बापाचे नाव तानाजी असे होते. हा कान्होजी शिर्क्यांच्या कुळातील कुटरे येथील शाखेतला होता. हा येसूबाईचा चुलतभाऊ कान्होजी जो इ.स. १६८२ मध्ये संभाजीच्या व कलुषाच्या जाचाला कंटाळून मोगलांना मिळाला तोच असावा.

या सगळ्या आपसांतील कलहामधून असे दिसून येते की, स्वराज्य, धर्माभिमान, राष्ट्रीयत्व या कल्पनांनी मूळ धरलेले नव्हते. फक्त स्वत:च्या स्वार्थाकरता अनेक शाह्यांमधून कर्तबगार मराठे फिरत होते. मानापानाच्या कल्पना, दुराग्रह यामुळे थोड्याशा अपमानाने ही मंडळी परकीयांना जवळ करीत असत. या सगळ्यांना एका ध्वजाखाली आणण्याचे महत्वाचे कार्य छत्रपती शिवाजी महाराजांनी केले. महाराजांच्या सहवासाने बाल येसूबाईच्या मनावर स्वराज्याबद्दलच्या कल्पनेचा इतका प्रभाव पडलेला दिसतो की, तिच्या संपूर्ण जीवनात तिने स्वत:चा वैयक्तिक स्वार्थ बाजूला ठेवून मराठी राज्याच्या रक्षणाकरता आपले आयुष्य खर्ची घातले.



: २ :

# छत्रपती शिवाजी - (येसूबाईवरील प्रभाव)

येसूबाईच्या जीवनावर ज्या ज्येष्ठ आणि श्रेष्ठ व्यक्तींच्या कार्याचा प्रभाव पडला त्यात प्रामुख्याने शिवाजी महाराज आणि जिजामातोश्री यांचा उल्लेख करावा लागेल. या दोन्ही माता- पुत्रांच्या कार्यकुशलतेचा, त्यांच्या स्वभाव वैशिष्ट्याचा ठसा येसूबाईवर उमटल्याच्या खुणा इतिहासात अनेक ठिकाणी दिसतात. शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील काही घटना या येसूबाईच्या जीवनातील घटनांशी इतके विलक्षण साम्य दाखवतात. (उदा. पुरंदरचा तह, अटी आणि झुल्पीकारखानाशी केलेला तह, अटी) कीं, या एकाच नाण्याच्या दोन बाजू असाव्यात असे वाटते. जिजामातोश्रींच्या छायेखाली वाढलेल्या येसूबाईच्या व संभाजीच्या स्वराज्याविषयक कल्पना, धार्मिक आत्मीयता, सामाजिक जाणिवा या इतक्या सारख्या आहेत की, जिजाबाईंच्या संस्कारामुळेच त्या इतक्या प्रमाणात या पतीपत्नींमध्ये उतरल्या असतील असे वाटते.

म्हणूनच येसूबाईच्या व्यक्तिमत्त्वाचा मागोवा घेण्याकरता जिजाबाई आणि शिबाजी महाराज या दोन श्रेष्ठ व्यक्तिमत्त्वांचा थोड्या विस्ताराने उल्लेख करणे आवश्यक आहे.

**हिंदवी स्वराज्य शिल्पकार -**

शिवाजी महाराजांनी हिंदवी राज्याची कल्पना आपल्या स्वराज्याच्या कल्पनेप्रमाणे "एतद्देशीयांचे भारतीयांचे राज्य" या अर्थी मानली आहे. स्वातंत्र्याची स्वतंत्र जोपासना करणारी व्यक्ती म्हणून शिवांजी महाराजांचे नाव सर्वश्रुत आहे. भारतीयांच्या भूप्रदेशावर यवनांनी आक्रमणे करून बळकावलेली सत्ता झुगारून देऊन हिंदू छत्रपतीचे स्वतंत्र राज्य महाराजांनी निर्माण केले ही बाब संपूर्ण भारतीयांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहे.

शिवाजी महाराजांना भारतीय संस्कृतीचा जाज्वल्य अभिमान होता. विजापूर काय किंवा मोगल काय यांच्या राजवटीत भारतीयांचे, हिंदूचे, सामाजिक, राजकीय आणि धार्मिक जीवन मलीन, निष्प्रभ व विस्कळित झाले होते.

महाराजांच्या चळवळीचे स्वरूप प्रामुख्याने राजकीय तर होतेच पण सांस्कृतिक बाबीतही त्यांचा दृष्टिकोण विशाल होता. भाषेच्या दृष्टीनेही सिद्दी, इराणी, तुर्की, उर्दूसहित सगळ्या भाषा त्याकाळी भारतीय म्हणूनच मान्य होत्या.तसेच भारतात राहणारे सर्व अठरापगड जाती-धर्माचे लोक हे भारतीय म्हणूनच मान्य होते. असा विशाल दृष्टिकोण असणाऱ्या या असामान्य छत्रपतीच्या कार्याचा प्रभाव येसूबाईवर पडला होता. म्हणून या हिंदवी स्वराज्याच्या शिल्पकाराकडे वळावे लागले.

स्वराज्याच्या उभारणीत दादोजी कोंडदेव आणि मातोश्री जिजाबाई यांचा महत्त्वाचा वाटा आहे. अनुभवी व मुत्सद्दी असे दादोजी, शहाजी राजांच्या दरबारी असताना अनेक राज्यक्रांत्या, युद्धे व अडचणी पाहिलेले वृद्ध यांची नेमणूक शिवाजी राजांच्या शिक्षणाकरता करण्यात आली. पुणे व सुपे या शहाजीराजांनी शिवाजी राजांना दिलेल्या स्वतंत्र जहागिरीची व्यवस्था दादोजींनी उत्तम अशी ठेवली. जहागिरीत अनेक सुधारणा घडवून आणल्या. पुणे आणि आसपासच्या प्रदेशावर कोंडाणा व इतर महालांचा सुभेदार व खास अधिकारी म्हणून त्यांना अदिलशहाने नेमले होते. त्यामुळे त्या संपूर्ण प्रांताची दादोजीला माहिती होती.

### शिवाजी महाराजांचे कर्तृत्व-

पुत्र म्हणून शहाजी राजांसारख्या पराक्रमी, कर्तबगार, विद्वान, चतुरस्र पित्याचा वारसा शिवाजी महाराजांना लाभला होता.

''शस्त्रेण रक्षिते राज्ये शास्त्रचिंता प्रवर्तते''

हे व्यास वचन शिवाजी महाराजांनी जाणले आणि युद्धविद्येची जोपासना करून महाराष्ट्र संस्कृतीचे रक्षण करण्याचे ध्येय आपल्या समोर ठेवले.

महाराजांनी आपल्या कार्याला सुरुवात मावळ भागातून केली. चाकण, तोरणा घेऊन इ.स. १६५६ मध्ये सुपे, बारामती, इंदापूर, जावळी तर पुरंदर, तोरणा, रोहिडा, लोहगड, राजमाची हे किल्ले राज्यात समाविष्ट केले. नवीन जन्माला आलेल्या मराठी राज्याला आदिलशाही व मोगल यांच्यासारख्या प्रबळ शत्रूंशी टक्कर द्यावी लागली.

**विजापूरशी सामना -**

शिवाजी महाराजांच्या वाढत्या उद्योगाकडे विजापूरचे लक्ष होते. इ.स.१६४९ मध्ये वाईचा सुभेदार अफजलखान याला शिवाजीवर पाठविण्यात आले. १० नोव्हेंबर १६५९ ला प्रतापगडाच्या पायथ्याशी अफजलखान व शिवाजी यांची भेट ठरली. यावेळी खानाचा वध करून त्यांच्या सैन्याची महाराजांनी दाणादाण केली.

या विजयाने शिवाजी महाराजांच्या बाजूला बळकटी आली. विजापूरवर पुन्हा स्वारी करण्यापूर्वी महाराजांनी कऱ्हाड, कोल्हापूरपर्यंतचा प्रदेश जिंकून घेतला. पन्हाळ्यासारखा विजापूरचा मानबिंदू असलेला गडही स्वराज्यात समाविष्ट झाला. या निमित्ताने विजापूरकरांच्या आधिपत्याखाली असलेल्या अनेक मराठी सरदारांचा महाराजांनी साम, दाम, दंड, भेद या नीतीने पराभव केला. त्यात सुर्वे यांच्या पदरी असलेल्या पिलाजीराव शिर्क्यांचाही समावेश आहे.

**शिवाजीमहाराज - मोगल संघर्ष-**

विजापूरनंतर महाराजांना मोगलांकडे लक्ष द्यावे लागले. "इ.स. १६६१ मध्ये शाहिस्तेखानाने पाठविलेल्या कहारतखानाचा पराभव उंबरखिंडीत महाराजांनी केला. त्यानंतर पुण्यात महाराजांच्या लाल महालात ठाण देऊन बसलेल्या शाहिस्तेखानाकडे महाराजांनी आपला मोर्चा वळविला." ५ एप्रिल १६६३ मध्ये शाहिस्तेखानावर छापा घालून त्याचा पराभव करण्यात आला. (१)शाहिस्तेखान उत्तरेत गेल्याच्या संधीचा फायदा घेऊन महाराजांनी मोगलांचे धनाढ्य शहर सुरत हे लुटले. हा आघात मोगलांना फार महागात पडला.

इ.स. १६६५ मध्ये महाराजांचा पाडाव करण्याकरता राजा जयसिंगसारख्या अनुभवी मुत्सद्द्याची योजना करण्यात आली. या प्रचंड मोगली शक्तीपुढे लहान, नुकतेच बाळसे धरू लागलेले स्वराज्य टिकणे कठीण होऊन बसले. मोठ्या मुत्सद्देगिरीने राजांनी पुरंदर येथे तह केला. राजांच्या ताब्यातील ३५ किल्ल्यांपैकी २३ किल्ले व १६ लाख रु. उत्पन्नाचा मुलूख मोगलांना देऊन महाराजांनी आपली सुटका करून घेतली. (२)

**शिवाजी महाराजांची आग्रा भेट -**

राजा जयसिंहाच्या आश्वासनावर पूर्णपणे विसंबून शिवाजी राजे आपल्या मुलासह व निवडक लोकांसह औरंगजेबाच्या भेटीस गेले. ''पुढे १५ मे १६६६ रोजी आगरियास जाऊन औरंगजेबाची भेट घेतली.'' (३)

''सेवाने अपने नऊ बरसका बेटे संभाके साथ जमीन चूमकर डेढ हजार अशरफी नजर और ६ हजार रुपये (= ३१,४०० रुपये) निश्लावर (४) किये'' असा औरंगजेब नाम्यात उल्लेख आहे.

**अग्र्यावरून निसटले-**

''सीवाजी संभाजीसह २७ सफरला (१७ ऑगस्ट १६६६) पळून गेला.''(५) पूर्वी संकेत ठरल्याप्रमाणे आग्रा येथून निसटल्यानंतर शिवाजी राजे कुरुक्षेत्री काही दिवस राहून मथुरेत आले. महाराष्ट्राचा इतिहास अग्र्याहून सुटकेच्या प्रसंगाने बदलून गेला.

इ.स. १६६८-६९ मध्ये दक्षिणेतील गमावलेले राज्य परत घेऊन महाराजांनी मोगलांशी अटळ असलेल्या संघर्षाची जय्यत तयारी केली.

**शिवराज्याभिषेक-**

आपल्या पराक्रमाने शिवाजी महाराजांनी आदिलशाही, कुतुबशाही, पोर्तुगीज, इंग्रज या सगळ्यांना आपला दरारा मान्य करायला लावला होता. परंतु विशिष्ट परंपरेने, संस्काराने प्राप्त होणाऱ्या अधिकाराला जास्त मानले जाते. पराक्रमी असूनही सरदारकी, मांडलिकी असणाऱ्या व्यक्तीला किती कमी प्रतीचे समजले जाते हे शहाजीच्या उदाहरणावरून शिवाजी महाराजांना समजले होते. राजा असूनही जयसिंगाची हीनावस्था महाराजांनी हेरली होती. त्यामुळे स्वयंपूर्ण सार्वभौम राज्यसत्तेची इच्छा महाराजांच्या मनात जागृत झाली होती. राज्याभिषेकाच्या निमित्ताने गागाभट्टासारख्या महापंडिताला पाचारण करण्यात आले.

''गागाभट्टांनी 'श्री शिवराज्याभिषेक प्रयोग' या ग्रंथाची निर्मिती केली. गागाभट्टासारख्या मान्यवराने पौरोहित्य केल्याने समारंभाला भारतीय महत्व प्राप्त

झाले. (६)६ जून १६७४ रोजी समंत्रक राजे छत्रपती झाले. या राज्यारोहणापासून राज्याभिषेक शक सुरू झाला. त्यामुळे शिवराय शककर्ते युगप्रवर्तक ठरले.''(७)

राज्याभिषेकाच्या निमित्ताने शिवाजी राजांची मुद्रा तयार झाली. ती अतिशय मार्मिक आहे.

प्रतिपद् चंद्रलेखेव ।
वर्धिष्णु विश्ववंदिता ।
शाहसूनोः शिवस्येषा ।
मुद्रा भद्राय राजते ॥

अखिल महाराष्ट्र मुद्रा संग्रहात या तोडीची मुद्रा नाही. ''विश्ववंदिता'' हे पद स्वातंत्र्य व सत्ता याचे दर्शक आहे. (८)

या समारंभाला राजस्नुषा येसूबाई उपस्थित होती.

**शिवाजी महाराजांची अखेर-**

चैत्र शुद्ध १५ ला इ.स. ३ एप्रिल १६८० शनिवारी २ प्रहर दिवसा रायगडावर महाराजांनी देह ठेवला. सर यदुनाथ सरकार म्हणतात, " It is beyond the power of any man, it is opposed to the divine law of the universe, to establish the "Swaraj" of such a caste-ridden, isolated, internally torn sect over a vast-continent like India."(9)

**युगप्रवर्तक शिवाजी महाराजांच्या सान्निध्यात येसूबाई-**

शिवाजी महाराजांचा राज्याभिषेक करून घेण्यामागे ''पूर्वी नष्ट झालेल्या विजयनगरच्या साम्राज्याचे पुनरुज्जीवन करण्याचा उद्देश होता. असा भास दक्षिणेतील सर्व हिंदूत निर्माण करावा म्हणजे त्याचा उपयोग आपणांस उत्तरेकडील येणाऱ्या मोगलांशी लढताना अवश्य होईल.''(१०)

महाराजांनी महाराष्ट्रात हिंदू राज्याची स्थापना करून भारताच्या इतिहासात एक नवीन पर्व सुरू केले. त्यांनी निर्माण केलेली शक्ती इतकी प्रचंड होती की, त्यांच्या मृत्यूनंतर औरंगजेब स्वतः दक्षिण भारतात मोठ्या सैन्यानिशी उतरून संपूर्ण महाराष्ट्रभर थयथयाट करत होता तरी मराठी सत्ता टिकून राहिली.

महाराजांच्या मृत्यूनंतर २७ वर्षे औरंगजेब या राज्याचे पारिपत्य करण्याकरता सर्व सैन्यानिशी लढत होता. परंतु मराठी राज्य अमर राहिले हा शिवशक्तीचा प्रचंड स्फोट होता.

महाराजांच्या उदाहरणाने बुंदेलखंडात बुंदेले, मथुरेत जाट, पंजाबात शीख यांनी मोगल सत्तेविरुद्ध उठाव केला.

सतत चव्वेचाळीस वर्षे महाराज स्वत: परिश्रम करत होते. मुसलमान झालेल्या हिंदूंना पुन्हा धर्मात घेण्याची महाराजांची कल्पना त्या काळच्या समाजाच्या मानाने धाडसाची होती. राज्यकारभाराच्या सेवेत मराठे, ब्राह्मण, महार, प्रभु, सारस्वत, मावळे, हेटकरी, देशी मुसलमान व इतर निधर्मी जातींचाही त्यांच्या कुवतीप्रमाणे उपयोग करून घेतला. एका माणसाचे हे कर्तृत्व वाखाणण्यासारखे आहे. हिंदू समाजाचे अस्तित्वच पठाणांनी नष्ट केले होते. शिवरायांच्या या क्रांतीमुळे हिंदू समाजाला मानाने जगता आले. कर्नाटकात स्वत:च्या राज्याचा वंश निर्माण करणे हा शिवाजी महाराजांच्या पराक्रमाचा व राजकारणी बुद्धिमत्तेचा उच्चांक मानावा लागेल. दक्षिणेच्या बंदोबस्ताकरिता शहाजीबरोबर तीन तपे घालविलेल्या विद्वान मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते यांची योजना करण्यात आली. कानडी, उर्दू, तेलगू, तामिळ, संस्कृत यांत हणमंते पारंगत होते. दक्षिणेत हिंदुत्वाचे पुनरुज्जीवन करण्यात महाराजांना त्यांची बरीच मदत झाली. रामदासांनी शिवाजी महाराजांचे समर्पक असे वर्णन केले आहे. '' निश्चयाचा महामेरू बहुत जनाचा आधारू अखंड स्थितीचा निर्धारू श्रीमंत योगी.''महाराजांच्या गादीचा वारस संभाजी असला तरी खऱ्या अर्थाने राजकारणाचे अनुभवी निरीक्षण केलेली अशी येसूबाई होती.

महाराजांच्या चळवळीचे स्वरूप प्रामुख्याने राजकीय तर होतेच. पण सांस्कृतिक बाबतीतही त्यांचा दृष्टिकोण विशाल होता, भारतात राहणाऱ्या अठरापगड जातीच्या लोकांना भारतीय म्हणून मान्यता होती. तसेच त्याकाळी भाषेच्या दृष्टीने उर्दूसहित सगळ्या भाषा भारतीय म्हणून मान्यता पावलेल्या होत्या. सर यदुनाथ सरकार यांच्यासारख्या शिवरायांच्या चिकित्सक अभ्यासकाचे म्हणणे महाराजांच्या सहिष्णुतेच्या धर्माची ग्वाही देण्यास पुरेसे आहे.

"The sincerity of his (Shivaji) faith is proved by his impartial respect for the holy men of all sects (Muslim as much as Hindu) and toleration of all creeds."

दर्यासारंग दौलतखान, इब्राहिमखानासारखे अधिकारी महाराजांच्या लष्करात होते. दानधर्मातही त्यांनी रामदास स्वामींना इनामे दिली. तशी पारगावच्या मोनीबाबालाही दिल्याचे दिसते.

मोगल सत्ता धर्मान्ध व मदान्ध. अनेक हिंदूंना बाटवून मुसलमान करण्यात आले होते. त्यांना पुन्हा हिंदू धर्मात आणण्याचे काम महाराजांनी केले. बजाजी निंबाळकरांना हिंदू धर्मात घेऊनच महाराज थांबले नाहीत तर आपली मुलगी सखूबाई त्यांना देऊन सोयरीकही करून घेतली. समाजसुधारणेला स्वत:च्या घरापासूनच महाराजांनी सुरुवात केली. लोकांना फक्त 'करा' असा उपदेश न करता स्वत: तो पायंडा महाराजांनी घालून दिला.

अशा या अद्वितीय राजाच्या सहवासात येसूबाईंचे बालपण गेले होते. बालपणी झालेले संस्कार हे खूप खोलवर होतात. त्यामुळे शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीतील असे काही प्रसंग येसूबाईच्या मनावर कायमचे कोरले गेले.

संभाजी हा स्वत:चा पुत्र असूनही येसूबाईंवर महाराजांचा जास्त विश्वास होता. संभाजीच्या अतिरेकी स्वभावाचे निरीक्षण महाराजांनी केले होते. त्यामुळे संभाजीबरोबरच येसूबाईला नेहमी महाराजांनी ठेवले. शृंगारपूरला संभाजीला प्रभावळीचा कारभार येसूबाईसह सोपवला. घरी राजारामाचा विवाह असूनही, आणि पन्हाळ्याच्या आसपास शत्रूंच्या हालचाली असताना संभाजीबरोबर येसूबाईला तिथे राहायला सांगणे या गोष्टींबरोबर लक्षात येते की, महाराजांचा संभाजीपेक्षा येसूबाईवर जास्त विश्वास होता. इतिहासात सत्य घटना पडताळून पाहाव्यात. कल्पनेला वाव देऊ नये हे मान्य करूनही पुष्कळदा एखाद्या घटनेचे संपूर्ण निवेदन करीत असताना काही गोष्टी अनुमानाने कल्पनेचा आधार घेऊन पडताळून पहाव्या लागतात. यालाच ऐतिहासिक कल्पना (Historical Imagination) असे म्हणतात.

येसूबाई व शिवाजी यांच्या परस्पर विश्वासाकरता असाच कल्पनेचा आधार

घेणे आवश्यक ठरते.

## मातोश्री जिजाबाई-

शिवाजी महाराजांना घडविण्यात मातोश्री जिजाबाईंचे योगदान अतिशय महत्त्वाचे आहे. त्याकरिता थोडे मागे जाऊन जिजाबाईच्या काळातील परिस्थितीचा आढावा घेणे महत्त्वाचे ठरेल. माणूस ज्या परिस्थितीत वावरत असतो त्या परिस्थितीनुसार घडत असतो हा सर्वसाधारण नियम आहे. याकरिता जिजाबाईकालीन राजकीय व सामाजिक परिस्थितीचा आढावा घेणे आवश्यक आहे.

## दक्षिणेतील राजकीय परिस्थिती-

दक्षिणेतील आदिलशाही, निजामशाही व मोगल यांच्या परस्पर आक्रमणामुळे अतिशय बेदिली निर्माण झालेली होती. दक्षिणी राजवटीत सर्वच राज्यकारभार हा इस्लामी राज्यकर्त्यांकडे असे. दिवान, वजीर ही मंडळी मुसलमानच असत. आपआपसांतील वैमनस्यात ही मंडळी स्थानिक हिंदू पुढारी, मुक्कदम यांची मदत घेत असत. स्थानिक हिंदू पुढारी, हिंदू अधिकारी याकरिता व आक्रमकांना तोंड देण्याकरता स्वत:चे घोडदळ, बारगीर वगैरे लष्कर बाळगीत असत. निजामशाहीत व आदिलशाहीत ज्या हिंदू पुढारी सरदारांना महत्त्व प्राप्त झाले होते त्यांत लखुजी जाधवराव व शहाजी भोसले हे होते. निजामशाहीची परिस्थिती अत्यंत हलाखीची होती. ती सुधारण्याचे काम शहाजी, मलिक अंबर हे करीत होते. अदिलशहाने मोगलांच्या सहाय्याने निजामशाही नष्ट करण्याचा प्रयत्न चालविला होता. (११) इ. स. १६२४ मध्ये झालेल्या भातवडीच्या युद्धाने मोगली विळख्यातून शहाजीने व मलिकंबरने निजामशहाची सुटका केली.

## आपसांतील वैमनस्य-

लखुजी जावधराव यांची कन्या जिजाबाई ही शहाजीची पत्नी म्हणून भोसले घराण्यात आली. या विवाहसंबंधाने भोसले व जाधव ही कुटुंबे एकत्र आली. निजामशाहीत दोन्ही घराणी सारख्याच योग्यतेची होती. १६२१ ते १६२४ च्या दरम्यान काही दुराग्रह, कुटुंबकलह किंवा व्यक्तिगत वैमनस्य

नसताना दोन्ही कुटुंबांत वैराग्नी निर्माण झाला. १९२४ नंतर मलिकंबर याच्याशी बेबनाव झाल्याने शहाजी निजामशाही सोडून आदिलशाहीत गेले. लखुजी जाधवराव याने मलिकंबरचा मुलगा फत्तेखान याच्या कारभारास विटून मोगलाईत जाण्याची खटपट चालविली. याचा संशय निजामशहाला आला. लखुजीचे सरदारांतील वर्चस्व सहन न होऊन मुसलमान राज्यकर्त्यांनी लखुजीचा भर दरबारात वध केला. लखुजीच्या खुनामुळे निर्माण झालेल्या राजकीय परिस्थितीत व त्यातच पडलेल्या अवर्षणामुळे जिजाबाई व शिवाजी यांना शिवनेरी माहुली म्हणजे सह्याद्रीच्या गडकोटावर सुरक्षित ठेवण्यात आले. (१२) दादोजी कोंडदेव, जिजाबाई व शिवाजी महाराजांसह इ.स. १६४१ मध्ये पुण्यास आले.

**जाधव घराणे -**

जाधवांचे घरी पुस्तकसंग्रह पुष्कळ मोठा होता. याचा उपयोग जाधव घराण्यातील स्त्रिया मोठ्या प्रमाणावर करीत असत. जिजाबाईंचा सुसंस्कृतपणा, साक्षरता हाच याचा पुरावा आहे.

सतराव्या शतकातील जिजाबाईसारख्या स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने राजकारण करीत. तसेच खेळाच्या निमित्तानेसुद्धा समाजातील इतर लोकांत मिसळत असत.

"रायगड दरबारी जिजाबाई बाहेर ओटीवर पुरुषांशी सोंगट्या खेळत बसे. त्यात तिच्या माहेरची गोमाजी पानसंबळ, एखादा ब्राह्मण प्रधान, एखादी ब्राह्मण बाई व इतरही स्पृश्य जातीचे लोक भाग घेत व तो खेळ पाहात बसत. इतका घरगुती व खेळीमेळीचा भाव परस्परांत वसत होता." असे शेजवलकर आपल्या 'शिवछत्रपती' प्रस्तावनेत म्हणतात. (१३)

जिजाबाईचा काळ हा शिवछत्रपतींच्या राज्यस्थापनेचा प्रारंभ काळ होता. त्यामुळे उषःकाली असणारा उत्साह, उमेद, समर्पणाची भावना ह्या काळाचा विशेष आहे. जिजाबाईंच्या स्वतःच्या मुलाला राजा करायचं या महत्त्वाकांक्षेला पूरक अशा तऱ्हेची परिस्थिती त्याकाळी नसूनही जिजामातोश्रींनी अनेक संकटांना तोंड देऊन, स्वतःच्या पतीजवळ (शहाजी) ऐष आरामात न राहता सह्याद्रीच्या

ओसाड माळ्यावर स्वराज्याचा शिल्पकार वाढवला.

राजकीय क्षेत्रात स्त्रीला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली ती शिवाजी महाराजांनी. जिजामातेने महाराष्ट्रात तेजस्वी स्त्री-जीवनाची परंपरा निर्माण केली. शिवाजी महाराजांच्या स्नुषेने -येसूबाईने जिजामातेचे स्वातंत्र्यप्रेम, त्याग, कार्यक्षमता याचीच परंपरा पुढे चालू ठेवली; आणि परकीय आक्रमणाच्या झंझावातात सापडलेल्या मराठी राज्याला कठीण प्रसंगी सांभाळण्याचे काम केले.

निजामशाही, आदिलशाही व मोगलाई यांच्या राजकारणात गुंतल्यामुळे शहाजीला शिवाजी महाराजांकडे द्यावे तेवढे लक्ष देता आले नाही. त्यामुळे मातोश्री जिजाबाईला शिवाजी महाराजांची संपूर्ण जबाबदारी घ्यावी लागली.

महाराष्ट्रात मराठी राज्य निर्माण करण्याकरता शिवाजी महाराजांना पूर्णत: जिजाबाईवर सोपवून शहाजीने तिकडे जाणून बुजून दुर्लक्ष केले असे म्हणता येईल. सरदार महाबतखानाने शहाजीवर सूड उगविण्याच्या दृष्टीने निजामशाही अधिकाऱ्यामार्फत वैजापूर येथे जिजाबाईस अटक करविली. परंतु लखूजी जाधवरावाचा भाऊ जगदेवराव जाधव मोगलांच्या पदरी होता. त्याने जिजाबाई व शहाजी यांचे पटत नाही तेव्हा जिजाबाईस कैद केल्यामुळे शहाजीवर काहीही परिणाम होणार नाही असा युक्तिवाद करून जिजाबाईची सुटका केली. (१३)

## जिजाबाईचा कारभार व शिवराज्यात सहभाग-

पुणे व आसपासच्या जहागिरीचा कारभार जिजाबाईकडे आला. त्याकरता जिजाबाईचा स्वत:चा फारशी शिक्का होता. त्याचा उपयोग ती पुणे, सुपे व आसपासच्या जहागिरीच्या व्यवस्थेकरता करीत असे. जिजाबाई हजर असलेले महत्तर प्रसंग व तिने घेतलेले निवाडे, सनदा ऐतिहासिक साधनात नमूद आहेत. (१४) दादोजी कोंडदेवाच्या मृत्यूनंतर संपूर्ण जबाबदारी जिजाबाईवर पडली. तिची जहागिरीच्या कारभारासंबंधी अनेक पत्रे आहेत.

इ.स. १६५३ साली जिजाबाईने जेजुरी येथील मिराशीच्या तंट्यात निवाडा दिलेला आहे. (१५) यावरुन जिजाबाईच्या न्यायदानाची कल्पना येते. हा निवाडा अंमलात आणावा म्हणून शिवाजी राजांनी कालनामा दिलेला आहे.

आईकडून शिवाजी महाराजांच्या शिक्षणाचे असे प्रात्यक्षिक होत होते. शिवाजी महाराजांवर आईचे प्रेम असले तरी ते डोळस होते. 'करंदीवाडीचा वेगळा गाव करण्याचे जिजाबाईने वाडीच्या रणपिशाच्या भिडेने ठरविले. ते शिवाजी महाराजांनी मान्य केले नाही. (१६) जिजाबाईही शिवाजी महाराजांचा मान राखीत असे. इ.स. १६५१-५२ मध्ये जिजाबाईंनी आज्ञा दिली आहे. त्या पत्राचा मजकूर याप्रमाणे, "चि. राजेश्री राजे यांचे पत्र आले. तरीही इमान अमानत (तहकूब) न करता पूर्वीप्रमाणे चालू ठेवणे." या अलौकिक स्त्री संबंधाने डॉ. बाळकृष्ण म्हणतात,

In one word, she had the head of a man over the shoulders of a woman. She remained a guide, philosopher and friend to Shivaji throughout her life.(१८)

माय-लेकरांची ही जोडी त्याकाळात सहकार्याने काम करीत असे. शिवाजी राजेही वेळोवेळी मातोश्रींची आज्ञा घेत. वडील शहाजी, मातोश्री जिजाबाई व गुरू दादोजी कोंडदेव यांच्या निरीक्षणातून शिवाजी महाराजांच्या कर्तृत्वाची दिशा स्पष्ट झालेली दिसते.

अफजलखानाच्या वधाच्या वेळी मातोश्रींनी सांगितल्याप्रमाणे शिवाजी महाराजांच्या डोळ्यांसमोर दोन गोष्टी होत्या. एक म्हणजे अफजलखानाने कपटाने शिवाजी महाराजांच्या मोठ्या भावाचा केलेला वध आणि दुसरे म्हणजे अफजलखानाने हिंदू देवतांची केलेली विटंबना. अफजलखानाशी लढायला जाताना महाराजांनी राज्याच्या व्यवस्थेसंबंधीचे पत्र जिजाबाईजवळ ठेवले होते. त्यात, "संभाजी व जिजाबाई यांना रायगडावर ठेवावे असे सांगून पराजय झाला तरी माझा मीच आहे. प्राणनाश झाल्यास संभाजी राजे आहेत. त्यांस राज्य देवून त्यांचे आज्ञेत तुम्ही राहावे" (१९) असे सांगितले. आग्रयास जातानासुद्धा अष्टप्रधान मंडळ व जिजाबाई यांना राज्याची सर्व जबाबदारी स्वीकारण्यास सांगून महाराज उत्तरेस गेले. या दोन्ही प्रसंगी मातोश्री जिजाबाईच्या मन:स्थितीची कल्पना येऊ शकते. संभाजीवर जिजाबाईचा फार जीव होता. आग्रयाहून परत आल्यावर संभाजीच्या मृत्यूची अफवा पसरवण्यात आली होती. संभाजी सुखरूपे परत आल्यावर जिजाबाईने पुष्कळ दानधर्म केला.(२०)

''शिक्के शिवाजी महाराज जिजाबाईंकडे ठेवून करवीत होते, त्याप्रमाणे संभाजी महाराजही येसूबाई साहेबांकडून शिक्के करवीत असत.''(२१) या उल्लेखावरून जिजाबाई साहेबांकडे शिवाजी महाराजांनी अंतर्गत कारभार सोपविला असल्याचे कळते. धार्मिक बाबतीत जिजाबाईंची आज्ञा महाराज मुख्यत्वे करून पाळत असत. लोकसंग्रहाकरता राजांनी ठिकठिकाणच्या सत्पुरुषांचा उपदेश ग्रहण केला व त्यांचा गौरव केला. चाकणचे सिद्धेश्वर भट ब्रह्मे यांना मातोश्रींच्या मार्गदर्शनातून वर्षासन देण्यात आले.(२२)

नेताजी पालकरांना मातोश्रींच्या आज्ञेवरूनच शिवाजी महाराजांनी हिंदू धर्मात घेतले असे शेजवलकर म्हणतात, ''शिवाजी हिंदू धर्म संरक्षक होता. पण साम्राज्यवादी नव्हता. पतितपरावर्तन हा मार्गही शिवाजीने अवलंबला होता. बजाजी निंबाळकर, नेताजी पालकर या मुसलमान झालेल्या मराठ्यांना आईच्या संमतीने परत हिंदू करविले, त्यांना शुद्ध करून घेऊन शुद्धिपत्रे देण्यात आली. (२३) या शुद्धीकरणाने महाराजांनी त्या काळात मोठीच क्रांती घडवून आणली.

७० वर्षांच्या वृद्ध मातोश्री जिजाबाईने आयुष्याच्या शेवटी आपला पुत्र छत्रपती झाल्याचे पाहून समाधानाने प्राण सोडला. जिजाबाईंच्या अनपेक्षित मृत्यूमुळे संभाजीच्या मौंजीचा समारंभ मात्र लांबणीवर टाकण्यात आला.

ही मातापुत्रांची जोडी जशी इतिहासात अजरामर झाली तशीच पुढे महाराणी येसूबाई व छत्रपती शाहू यांचीही जोडी आपल्या कर्तृत्वाने इतिहास घडविण्याला कारणीभूत ठरली



# संदर्भ सूची


१. पगडी सेतू माधवराव.- महाराष्ट्र व मराठे पृ. ४०

२. छत्रपती शिवाजी महाराज पृ. १३०

३. शकावली.

४. औरंगजेबनामा.

५. अलमगीरनामा.

६. पोतदार द.वा. - श्री. शिवचरित्राचे पैलू.

७. उपरोक्त

८. उपरोक्त. पृ. ९३

९. यदुनाथ सरकार. - शिवाजी पृ. ३७५

१०. शेजवलकर.- शिवाजी

११. बेंद्रे वा.सी. - छत्रपती संभाजी

१२. राजवाडे खंड १२ ते २२

१३. उपरोक्त. खंड १६ लेखांक ९२

१४. उपरोक्त खंड १७ लेखांक १३.

१५. छत्रपतींची ९१ कलमी बखर. वाकसकर, वि.स. राजवाडे खंड १३ कौलपत्र.

१६. पेशवे दप्तर ३१ ते ४१

१७. शिवचरित्र साहित्य. खंड २८ लेखांक ११.

१८. बाळशास्त्री हरदास.- छत्रपती शिवाजी भाग २ पृ. ५०

१९. सभासद बखर. पृ. १२.

२०. ९१ कलमी बखर पृ. ४२

२१. चिटणीस बखर पृ. १२

२२. शेजवलकर.- शिवाजी पृ. ५६३-६७

२३. उपरोक्त पृ. १०४

# प्रकरण तिसरे
# शिवपुत्र संभाजी

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर मराठी राजकारणाला कसे वळण लागले हे पाहणे आवश्यक आहे. शिवाजी महाराजांनी दक्षिणेकडे सर्वदूर स्वाऱ्या करुन स्वपराक्रमाने एक कोटी होनाचा प्रदेश मिळविला. परंतु नकाशावरून तो कसा दाखवायचा हा प्रश्न आहे. महाराजांच्या मृत्यूपर्वी एकाही शत्रूचा पूर्ण बिमोड झाला नव्हता. त्यामुळे एकमेकांच्या रेटारेटीत राज्याच्या सरहद्दी पुढे मागे होत होत्या. एकदा केलेले तहही पाळले जात नव्हते. त्या तहाची अंमलबजावणी होण्यापूर्वीच दुसरीकडे स्वारी केली जात होती. (१) वतनाकरता प्रसिद्ध असलेली देशमुख, देशपांडे मंडळी स्वत:च्या स्वार्थाकरिता अनेक शाह्यांमधून आज महाराजांचे तर उद्या मोगलांचे असे बांधील राहात होते. रयतेत राष्ट्रीय बाणा वगैरे प्रकार नव्हताच. जो पोटाला देईल त्याच्याकडे ती वळत असे.

स्वराज्यात संभाजी, सोयराबाई व राजप्रतिनिधी असा सामना महाराजांच्या मृत्यूपूर्वी सुरू झाला होता. या सर्व प्रकरणाचा बंदोबस्त करण्याचे महाराजांच्या मनात असावे. त्यांनी स्वत:च या राज्याची व्यवस्था आणि त्याचा वारस याचा विचारपूर्वक निर्णय घेण्यापूर्वीच रायगडावर राजप्रतिनिधींच्या अनुपस्थितीत महाराजांचा मृत्यू घडून आला. त्यामुळे मनात असलेले आणि सुरू केलेले सगळेच संकल्प अपुरे राहिले. या परिस्थितीतून संभाजीसह येसूबाईने कसा मार्ग काढला व ती किती यशस्वी झाली हे पाहणे आवश्यक आहे.

**बाल संभाजी -**

शिवाजी महाराजांना पहिल्या तीन मुलीच होत्या. त्यानंतर ज्येष्ठ शुद्ध १२ शके १५७९ म्हणजे १४ मे १६५७ ला संभाजीचा जन्म पुरंदर येथे झाला. पुत्रजन्मापासून सईबाई आजारीच असल्यांमुळे ५ सप्टेंबर १६५९ ला तिचा मृत्यू झाला. त्यावेळी संभाजी केवळ दोन वर्षांचा होता. कनकगिरीच्या लढाईत मारल्या गेलेल्या आपल्या मुलाचे नाव 'संभाजी' हेच जिजाबाईने नातवाला

ठेवले. संभाजीची सर्वस्वी जबाबदारी जिजाबाईनेच घेतली. सईबाईच्या आजारपणामुळे संभाजीची दूध आई म्हणून नसरापूर जवळच्या कापूरवहाळ गावच्या गाडे घराण्यातील धाराई आवा या स्त्रीला रायगडी आणून ठेवण्यात आले. धाराई आवाला शिवाजी महाराजांनी २६ होन (वार्षिक) तैनात करून दिले होते. (२) शिवाजी महाराजांचा दुसरा पुत्र राजाराम याचा जन्म १६७१ साली झाला. म्हणजे १२-१३ वर्षे दुसरा मुलगा नसल्याने संभाजी हाच सगळ्यांचा कौतुकाचा विषय होता. राज्याचा भावी वारस म्हणून संभाजीकडे पाहिले जात होते. संभाजी युवराज म्हणून वाढवला जात होता. अफजलखानाच्या भेटीस जात असताना आपल्या मागे राज्याची जी व्यवस्था शिवाजी महाराजांनी केली होती त्याचे वर्णन सभासद बखरीत आहे. ''संभाजी व जिजाबाईस रायगडी ठेवावे असे सांगून पराजय झाला तरी माझा मीच आहे. प्राणनाश झाला तर संभाजी राजे आहेत. त्यास राज्य देवून त्यांचे आज्ञेत तुम्ही वागावे '' असे सांगितले. (३)

**शिक्षण -**

जिजाबाईंनी त्याला रामायण महाभारतादीचे वर्णन सांगितले. परंतु संभाजीला युवराज म्हणून विशिष्ट प्रकारचे शिक्षणही जाणीवपूर्वक देण्यात आले. केशवभट व उमाजीपंडित या दोघांची व्यवस्था संभाजीला शिक्षण देण्याकरता करण्यात आली होती. केशवभटांनी संभाजीकडून रामायण महाभारतादी ग्रंथांचे वाचन करविले. त्याबद्दल केशवभटाला दिलेल्या सनदापत्राचा उल्लेख केशवभटाचा मुलगा रामचंद्रभट याने केला आहे. ''थोरले महाराज कै. स्वामीजवळ होते. त्यांचे बरोबर दानाध्यक्षपणाचे प्रयोजन महाराज घेत होते. याउपरी राजश्री कै. स्वामी (संभाजी) राजे जवळ होते............ त्यासी स्वमुखे रामायण पुराण श्रवण केले.''(४) संभाजीला कोणकोणत्या प्रकारचे शिक्षण दिले होते याची पुष्कळशी माहिती सभासद व चिटणीस बखरीवरून होते. ''संभाजीने विद्या अभ्यास करावा, त्याला सुशिक्षित करावा म्हणून त्याला घोड्यावर बसवणे, शस्त्रविद्या, तालीम, तिरंदाजी याचे शिक्षण देवविले.'' संभाजीने 'बुधभूषण' हा ग्रंथ लिहिला. (५) त्यात त्याचे कशा तऱ्हेचे शिक्षण झाले होते याचे वर्णन आहे.

तस्यात्मजः शंभुरिति प्रसिद्धः समस्तसामंताशिरोवतंसः ।
यः काव्यसाहित्यपुराणगीत कोदण्डविद्यार्णवपारगामी ॥ १५॥

(म्हणजे काव्य, अलंकार शास्त्र, पुराणे, संगीत आणि धनुर्विद्या यांत पारंगत असलेला त्याचा (शिवाजीचा) मुलगा शंभू हा सर्व मांडलिक राजांच्या अग्रस्थानी शोभत आहे.)(६)

संभाजीला संस्कृतची चांगली जाण होती. गंगाधर रामचंद्र कुळकर्णी कसबे इर्सूल यास मोगलांनी बाटविले होते. त्याला मिताक्षरादि निबंध पाहून पावन करून घेण्यात आले. असा उल्लेख मोरेश्वर पंडितराव यांच्या जाहीर आज्ञापत्रात आहे. (७)

राज्यव्यवहारोपयोगी शिक्षणही संभाजीला ज्ञात होते. वतनाच्या नेमणुकी-बाबतच्या तंट्यात राहुरीपंताविरुद्ध कृष्णाजी सोमनाथ याने तक्रार केली होती. त्यावेळी ब्राह्मण कृष्णाजी यांनी संभाजीच्या विद्वत्तेला मान्यता दिली होती ती अशी, "साहेब सर्वज्ञ शास्त्राचा अर्थ स्वत: पंडिताचा निशा होय, ऐसा करताना ऐसे असोन माझे पारिपत्य होत नाही." संभाजीने मंचकारोहणानंतर तुळजापूरच्या देवीकरता आद्यंत संस्कृतात असे वार्षिक नेमणूक पत्र करून दिले आहे." त्यात संभाजीने भोसले कुलवृत्तांत वर्णन केला आहे. "नमत्सुगशिरश्रुवि" असे शंभु (शिखर शिंगणापूरचा श्री महादेव, भोसले घराण्याचा कुलदेव) त्याच्या नमनाचा श्लोक आहे. हाच श्लोक पुढे राजारामाने दिलेल्या सनदापत्रातही आढळतो.(१०) या संस्कृत दानपत्रात येसूबाईची मुद्रा पत्रांतर्गत आहे. यावरून तिच्याही सुशिक्षितपणाची कल्पना येते.

औरंगजेबाशी लढताना सगळ्या आघाड्यांवर संभाजीने जो पराक्रम केला त्यात त्याला मिळालेल्या शिक्षणाचे प्रतिबिंब पडलेले दिसते. अ‍ॅबे कॅरे लिहितो, "शिवाजी राजांनी आपल्या सैन्यांचे विभाग करून शेजारच्या शत्रूवर हल्ला चढविला.......... शिवाजी राजांनी १०,००० शूर असा सैन्यांचा विभाग आपल्या मुलाच्या - संभाजीच्या ताब्यात दिला होता. हा युवराज लहान असला तरी धैर्यशील व आपल्या पित्याच्या कीर्तीस साजेल असा शूर आहे........ सैनिकांचे त्याच्यावर प्रेम आहे............ त्याच्या हाताखाली लढण्यात त्यांना

धन्यता वाटते. ................... संभाजीही त्यांचे कौतुक करतो. त्याच्यासमोर एखाद्याने शौर्य दाखवले तर संभाजी त्याला बक्षिस दिल्याशिवाय राहत नाही.''(११)

**संभाजी-येसूबाई विवाह-**

स्वराज्याच्या उभारणीत अनेक परकीय व आप्तस्वकीय यांच्याशी शिवाजीमहाराजांना तोंड द्यावे लागले. या सर्वांना आपल्या कार्यात समाविष्ट करण्याकरता महाराजांना प्रसंगी त्यांच्याशी साम, दाम, दंड, भेद या नीतीचाही उपयोग करावा लागला. शृंगारपूरचे सुर्वे यांच्याकडून २९ एप्रिल १६६१ ला महाराजांनी शृंगारपूर घेतले. सुर्व्यांच्या पदरी असलेले शिर्के यांना महाराजांनी आपल्याकडे वळवून घेतले. पिलाजी शिर्के यांच्या मुलीशी-राजसबाईंशी संभाजीचे लग्न निश्चित केले. लग्न समारंभ इ.स. १६६१ ते ६५ च्या दरम्यान झाला असावा. ''संभाजी महाराज व शिर्के यांची कन्या शरीरसंबंध सिद्धांत करून बहुतच तरतूद साहित्य करवून मोठे समारंभ करून, पाच चार लक्ष रुपये खर्च होऊन करिते जाले. वधु जाली त्याचे नांव येसुबाई साहेब ऐसे ठेवले.''(१२) पूर्वीच्या काळी मुलीबरोबर पाठराखीण म्हणून पाठविण्याची पद्धत होती. या विवाहानंतर शिर्के घराण्याशी संबंधित असलेले शृंगारपूरचे केशवभट व रघुनाथ पंडित असे दोन विद्वान शिवाजी महाराजांकडे आले. केशवभटाची योजना शिवाजी महाराजांनी संभाजीच्या शिक्षणाकरता केली. वयाच्या ५-६ वर्षांपासून येसूबाई भोसले कुळात नांदत असल्यामुळे साहजिकच केशवभटासारखे तिच्या माहेरचे शिक्षक संभाजीला शिकवण्यास असल्यामुळे येसूबाईही त्यांच्याकडे शिकत होती. संभाजीच्या काळातील येसूबाईच्या पत्रातून तिच्या सुशिक्षितपणाची कल्पना येते.

संभाजीचा दुसरा विवाह दुर्गाबाई नावाच्या स्त्रीशी झाला होता असे ''ताराबाई कालीन कागदपत्रात म्हटले आहे.'' गिरजोजी यादव याला दौलताबादेच्या किल्ल्यावर ठेवलेल्या दुर्गाबाईला सोडविण्यासंबंधी जे पत्र दिले आहे, त्यात 'मातोश्री दुर्गाबाईसाहेब' असे म्हटले आहे. (१३) तसेच संभाजीराजास ज्यावेळी कैद झाली त्यावेळी त्याच्याबरोबर त्याची पत्नी होती

असा उल्लेख आहे. ही स्त्री येसूबाई नव्हती. म्हणजे दुर्गाबाई असावी असे म्हटले जाते. परंतु या दुसऱ्या विवाहाविषयी कुठेही नोंद नाही, कारण दुर्गाबाईच्या माहेरासंबंधी विवाहासंबंधीचा पुरावा कुठेही इतिहासात आढळत नाही.

संभाजीचा तिसरा विवाह कच्छवाह घराण्यातील चंपा नावाच्या स्त्रीशी अनुलोम पद्धतीने झाला असे बेंद्रे आपल्या 'छत्रपती संभाजी'त म्हणतात. याच स्त्रीला पुढे ते दुर्गा म्हणूनही संबोधतात. दुर्गाबाई येसूबाईबरोबर दक्षिणेस परत आली ती मदनसिंगाची बायको असावी. चंपाचा नंतर इतिहासात कुठेच उल्लेख नाही. राजवाडे संशोधन मंडळाच्या 'ऐतिहासिक लेख चर्चा' यात 'शंभुराज चरित' या काव्याचा नायक छत्रपती नसून नंदुरबार येथील देसाई घराण्यातील शंभुदास शिवदास देसाई हा आहे हे सिद्ध झाले आहे.

सदरहू विषयासंबंधी भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटच्यूटचे क्यूरेटर श्री.पी. के.गोडे यांनी 'The History of the Jatasamkara Temple at Nandurbar.' या नावाने लिहिलेल्या लेखातील 'शंभुराजरचित' या काव्याचा नायक मेहता शंभुदास शिवदास देसाई आहे. शिवाजीपुत्र संभाजी नव्हे हे देसाईंच्या पत्रव्यवहारावरून सिद्ध झाले आहे. (१४) शिव व शंभु या नावांच्या साम्यावरून हा घोटाळा झाला असावा. सर यदुनाथ सरकार चंपाला संभाजीच्या अनौरस पुत्राची-मदनसिंगाची माता असावी असे म्हणतात. संभाजीला अनेक उपस्त्रिया असाव्यात. तो त्याकाळचा रिवाजही होता.

**मोगल आणि मराठे-**

सेतु माधवराव पगडी यांच्या पुस्तकात पृष्ठ ५६ वर खालील मजकूर संभाजीच्या दुसऱ्या विवाहासंबंधी आढळतो.

**शिवाजीची युक्ती (इ.स. १६७५)**

आदिलशहाच्या मृत्यूनंतर त्याचे मुलुख आपल्या ताब्यात आणण्याची शिवाजीची इच्छा होती. अकलूजच्या ठाण्यावर रणमस्तखान हा मोगल ठाणेदार होता. जाधवराव दखनी यांचा पुतण्या रुस्तुमराव हा रणमस्तखान याजपाशी तैनात होता. शिवाजीने रुस्तुमरावाच्या मुलीशी आपला मुलगा संभाजी याचे लग्न ठरविले. (१५) हा उल्लेख ऐतिहासिक पुरावा(१६) म्हणून मानले तरी

लग्नाचा उल्लेख आढळत नाही. वधूच्या नावाचाही पत्ता नाही. संभाजीला येसूबाई ही एकच राणी होती, हे सिद्ध होते. कमल गोखले येसूबाईबरोबर दक्षिणेत आलेली दुर्गाबाई ही संभाजीची बायको असावी असे म्हणतात. परंतु शाहूने बाळाजी विश्वनाथाला दिल्लीहून येसूबाईसहित मंडळींना आणण्यासंबंधीचा जो करारात उल्लेख केला आहे, त्यात "मातोश्री व मदनसिंगदेखील कबीले व दुर्गाबाई सेवक लोक मागोन घेणे असे आहे." म्हणजेच ही दुर्गाबाई संभाजीची पत्नी नसावी.

छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथामध्ये भाऊसाहेब पवार यांनी संभाजीच्या 'एकपत्नीत्व' या श्रेष्ठ गुणाची वाखाणणी केली आहे. सरदेसाई, "येसूबाईशिवाय दुसरी विवाहित स्त्री संभाजीला असल्याचा उल्लेख नाही." हे मानतात.

या सर्व पुराव्यांवरून संभाजीला येसूबाई ही एकच विवाहित स्त्री असावी असे मानायला हरकत नाही.

**संभाजीची आग्राभेट-**

शिवाजी महाराजांबरोबर ९ वर्षांचा संभाजीही आग्र्याला गेला होता. १२ जून १६६५ ला झालेल्या महाराज व जयसिंग यांच्या भेटीनंतर मोगलांकडून संभाजीला पाच हजारी मनसबीचा अधिकार मिळालेला होता. त्यामुळे मनसबदार संभाजी आग्र्याला जाणे क्रमप्राप्त होते. दरबारात झालेल्या अपमानानंतर शिवाजीराजे पुन्हा दरबारी गेले नाहीत. मात्र लहान संभाजी हा रामसिंगाबरोबर दरबारी जात असे. अशाच एका भेटीत औरंगजेबाने एका मल्लाबरोबर संभाजीला मल्लयुद्ध करायला सांगितले. परंतु संभाजीने त्याला साफ नकार दिला.

प्रादुर्भूत बालभावेद्र प्रस्थापिनाथनुज्ञात मल्लयुद्ध दत्ताज्ञा भंग :(१७)

**आग्र्याहून सुटका -**

१७ ऑगस्ट १६६६ ला शिवाजीराजे संभाजीसह कैदेतून निसटले. शिवाजीराजे मिठाईच्या टोपल्यातून व संभाजी राजे रामसिंगाबरोबर बाहेर पडले. ती सर्व मंडळी पूर्वी संकेत ठरल्याप्रमाणे आग्रा शहराबाहेर पडली. संभाजीचे वय लहान असल्यामुळे "संभाजी राजे यांचे अल्पवय, चालावयास अभ्यास नाही, देशी नावे तरी निभावली कशी होती, महासंकट वाटले, परंतु जगदंबा

सानुकुल, त्यायोगे मोरोपंत पेशवे यांचे मेहुणे अन्नाजीपंत व काशीपंत व विसाजीपंत हे त्रिवर्ग बंधु कुटुंबसुद्धा मथुरेत राहिले होते.................. परस्पर शपथप्रमाण घेऊन संभाजी महाराजास त्यांचे हवाली केले .............. महाराजांनी आज्ञा केली की, आम्ही देशी पावल्यावरी तुम्हास लेहून पाठवू. नंतर तुम्ही चिरंजीवास घेऊन यावे.''(१८)

या मंडळींनी संभाजी महाराजांना सुखरूप दक्षिणेत आणले, संभाजीला या ब्राह्मणांनी बटुवेश दिला व अनेक तऱ्हेच्या अडचणी सोसून त्यांनी संभाजीला मोंगली विळख्यातून परत आणले. त्याबद्दल काशीपंत व विसाजीपंत व कृष्णाजीपंत यांस ''विश्वासराव हा किताब देऊन पालखी, हत्ती, सरंजाम, बहुमान वस्त्रे, अलंकार दिल्हे.'' उत्तरेकडील धरपकडीच्या औरंगजेबाच्या कचाट्यातून संभाजी दक्षिणेत पोचणे कठीण होते. म्हणून संभाजीच्या मृत्यूची अफवा पसरवण्यात आली. शिवाजी कवी कलशाकडून आपणास संभाजीच्या मरणाचे बातमी देणारे पत्र आले म्हणून जाहीर शोक करू लागला, संभाजीच्या बायकोने अतिशोकाने सती जावे असे इच्छिले पण मोठ्या मिनतवारीने तीस सती जाण्यातून परावृत्त केले, मात्र मयतासंबंधी करावयाची सर्व उत्तरकार्येही उरकून घेतली. अशा तऱ्हेने संभाजी मेल्याचे जाहीर केले.(१९)

आग्र्याला जाणे व परत येणे या कालावधीत संभाजीच्या बालमनावर जो मोठा ठसा उमटला तो त्याच्या पुढील आयुष्याची दिशा ठरविण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. औरंगजेबाचा दरबार, मोगलांचे वैभव, मानसन्मानाच्या कल्पना, अनेक तऱ्हेचे षौक, उपभोग या सर्वांचा संभाजीच्या दृष्टिकोणातून जो विचार केला गेला त्याचा परिणाम त्याच्या पुढील जीवनावर झालेला दिसतो. येसूबाईची लग्नगाठ संभाजीशी बांधिली असल्यामुळे या सर्व स्वभाववैशिष्ट्यांचा परिणाम साहजिकच येसूबाईवरही झालेला दिसतो.

**संभाजीचा राजकारणात सहभाग-**

संभाजीला शिक्षण देतानाच त्याचा अधिकार काय आहे याचे वर्णन चिटणीस बखरीत केलेले आहे. ''संभाजी राजे प्रबुद्ध जाले त्यास व राजारामसाहेब यास विद्याभ्यास करवावा, सुशिक्षित असावे म्हणोन, घोड्यावर

बसणे, शास्त्रविद्या, तालीम, तिरंदाजी सर्व करविते जाले. आपण राजे व हे राजपुत्र पुढे राज्यास अधिकारी हे आपण महाराष्ट्र राज्य आक्रमून धर्म स्थापना केली ते पुढे यांचे हाते पावावा. अष्टप्रधान यातच राजपुत्राची गणना आहे. सर्व अमात्य राजाचा वाम भूज युवराज राजपुत्र हा सव्यभूज असे आहे.''(२०)

विवाहानंतर भावी युवराज म्हणून संभाजीची अनेक रूपे येसूबाईला अगदी जवळून पाहता आली. राजकारणातील चातुर्य व सहभाग याचे अवलोकन तिने केले होते. १२ जून १६६५ ला शिवाजी महाराज व राजा जयसिंग् यांच्यात झालेल्या भेटीनंतर, छोट्या संभाजीचा केवळ आठव्या वर्षी राजकारणात प्रवेश झालेला दिसतो. स्वत:ची मोगली ताबेदारीतून सुटका करून घेण्याकरता शिवाजी महाराजांनी बाल संभाजीचा उपयोग करून घेतला. संभाजीच्या नावाने मोगलांच्या पंचहजारी मनसबीचा स्वीकार करण्यात आला. औरंगजेबनाम्यात या प्रसंगाची नोंद आहे. ''औरंगजेबाने राजा जयसिंगाच्या विनंतीवरून शिवाजी राजास माफीचे फर्मान पाठविले. त्यात बादशहाने संभाजीस ५,००० ची मनसब (५हजार स्वार २-२, ३-३ घोड्यांसह) बहाल केली.(२१)

बादशहाने पाठविलेल्या फर्मानाप्रमाणे झालेल्या तहाने बाल संभाजीला मोगलांकडे एकप्रकारे ओलीसच ठेवण्यात आले. आग्र्यावरून आल्यानंतर शिवाजी महाराजांचा शहाअलमशी तह झाला. या तहाने ''संभाजीला ४,००० स्वारांची मनसब आणि वऱ्हाड व खानदेशात मोकासा देण्याचे ठरले.(२२) ४ नोव्हेंबरला १६६७ संभाजीची शहाअलमशी भेट झाली.'' शहाअलमने संभाजीला एक हत्ती व रत्नजडित तलवार भेट दिली. मनसबदारीच्या तांत्रिक बाबी पूर्ण झाल्यानंतर जयवंतसिंगाच्या माणसाबरोबर ५ नोव्हें. १६६७ ला संभाजी रायगडाला पोचला.(२३)

मातोश्री जिजाबाई या वृद्ध झाल्यामुळे महाराजांच्या गैरहजेरीत रायगडावरील कारभार मुख्यत्यारीने करण्याची जबाबदारी संभाजीवर टाकण्यात आली. ''शके १५९२ माघ वद्य ११ (दि. १६ जाने. १६७१) संभाजीला कारभार सांगितला.'' (२४) पूर्वी महादजी यमाजी हा चि.संभाजी राजे याकडे वाकनिसाचे

मुतालिक होता. त्याला दरबारात येण्याजाण्याचे काम करावे लागे. त्याला यानिमित्त वार्षिक १०० होन मुक्रर केले होते. लिहिण्यासाठी कागद, शाही (शाई) सिरे व मदतनीस देण्यात शिवाजी महाराजांनी १९-९-१६७१ या दिवशी धारराव निंबाळकर यास लिहिले होते.(२५) याप्रमाणे संभाजीला स्वतंत्र लेखनिक देण्यात आला.

**इंग्रजांशी संबंध-**

राज्यकारभाराचे शिक्षण घेत असताना इंग्रजांशी संभाजीचा संबंध आला. शिवाजी महाराजांशी तह करण्याकरता महाराजांच्या गैरहजेरीत इंग्रज वकील थॉमस निकोल्सनशी संभाजीला बोलणे करावे लागले. शिवाजी महाराजांची भेट होत नसल्यास त्याचा मुलगा किंवा जो अधिकारी असेल त्याला भेटून परत यावे अशी सूचना त्याला (निकोल्सनला) देण्यात आली होती. शिवाजी महाराजांनी पिलाजी शिर्के (संभाजीचे सासरे, येसूबाईचे वडील) यांना इंग्रजांशी तह करण्याचे अधिकार दिले होते. संभाजी लहान व अननुभवी असल्यामुळे महाराजांनी पिलाजीवर या गोष्टी सोपविल्या होत्या.(२६) संभाजीने स्वत: निकोल्सनची भेट घेतली व त्याचे कामाचे स्वरूप ऐकून घेतल्यावर, ''मला या बाबतीत काही करता येत नाही, मी तुमच्या आगमनाबद्दल महाराजांना कळवतो. म्हणजे ते लवकर येतील. तुमच्या प्रकृतीला गडावरची हवा मानवणार नाही. तेव्हा गडाखाली जाऊन राहा.'' असे संभाजीने सांगितले.(२७) महाराजांच्या पश्चात संभाजीने इंग्रज वकिलाला मोठ्या शिताफीने गडाबाहेर राहण्याची सूचना दिली.

शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीतील स्वराज्यातील वतनाबाबत कारभारांत संभाजी भाग घेत असे. या काळातील दोन पत्रे संभाजीची आहेत. त्यावर मोरोपंतांची मुद्रा आहे. ही पत्रे 'अजरबाखाने' या मायन्याची नसून 'मशहुरल अनाम' या मायन्याची आहेत. जुन्नर व पुणे येथील सुभेदारांना लिहिलेली ही पत्रे आहेत. या पत्रांवरून महाराजांच्या हयातीत संभाजी राज्यकारभारात लक्ष घालत होता, हे सिद्ध होते.

**संभाजीची धार्मिक मतप्रणाली-**

औरंगजेबाला पाठविलेल्या जिझिया कराबद्दलच्या तीन पत्रांचा उल्लेख "राजवाड्यांचा इतिहास लेख चर्चा" या संग्रहात आहे.(२८)

राजवाडे संशोधन ग्रंथमाला ऐतिहासिक लेख चर्चा भाग २ रा भा.वा.मट यांनीं प्रकाशित केलेल्या धुळे येथील लेखात जिझिया कर पृ. १२९ यांत(२९) औरंगजेबाला पाठविलेल्या जिझिया कराबद्दलच्या तीन पत्रांचा उल्लेख आहे.

कलकत्त्याच्या बं.ए. सोसायटीच्या संग्रही असलेल्या पत्रात हे लिहिणारा संभाजी असे नमूद केले आहे. त्याविषयीचे लेखकाचे मत ........... हिंदू धर्मावर औरंगाजेबाकडून होणाऱ्या जुलमाचा संभाजीला फार संताप येत असे. व त्याचा तो द्वेष करी. इ.स. १६८२ च्या नोव्हेंबर महिन्यात संभाजीने राजा रामसिंग यास लिहिले पत्र उपलब्ध झाले. त्यातील खालील उद्‌गार महत्त्वाचे आहेत.

" The present wicked Emperor believe that we Hindus have all become efiminate and that we have lost all regard for our religion. Such as attitude on the part of Emperor we can not any longer endure. We can not put up with any think derogatory to our charactor as soldiers (kshatriyas). The Vedas and the codes which we can not allow to lotrampled under foot nor we neglect our duty as king to our subjects. We are prepared to sacrifice everything our tresure or our land our forts in waging war against the satanic Emperor.(यदुनाथ सरकार - व्हॉइस ऑफ शिवाजी)

त्यातील संभाजीच्या उद्‌गारांवरून तो हिंदू धर्माचा कट्टर अभिमानी होता हे दिसून येते. हिंदू धर्मावर जुलूम करणाऱ्या औरंगजेबाबद्दल त्याला अत्यंत चीड होती. त्याच्या या मनोरचनेची कल्पना करता संभाजीने जिझिया करावाबत औरंगजेबाची कानउघाडणी करण्याकरता हे पत्र शिवाजी महाराजांच्या पत्रास अनुसरून इ.स. १६७८ नंतर लिहिणे संभवनीय आहे. १६७८ पासून संभाजी राज्यकारभारात लक्ष घालू लागला होता. अखिल हिंदू जनतेस जाचक होणाऱ्या या अन्यायी कराबद्दल त्याने हे पत्र औरंगजेबास लिहिले असावे असे अनुमान करणे युक्तीस सोडून होणार नाही.

शिवाजी महाराजांप्रमाणे बाटविलेल्या हिंदूंना पतितपावन करून घेण्यासाठी संभाजीने बरेच हुकूम काढलेले आहेत.(३०)तसेच त्यांना पतितपावन करून घेण्याकरता सरकारी तिजोरीतून पैसेही दिल्याची नोंद आहे. त्यातला काही भाग-

''श्री क्षेत्र समस्त धर्माधिकारी आदि करुन ब्राह्मण संमतीने तीर्थविधी करुन ब्राह्मण भोजन करून अन्नप्रसाद पंक्तीस घेतला. शुद्धीभोजने व प्रायश्चित प्रदक्षणा यथा विधी केला.''(३१) शिवरायांच्या वेळी ज्या ज्या तीर्थक्षेत्रांना मान्यता दिली होती त्यांना कोणत्याही प्रकारे उपसर्ग पोचू नये म्हणूनही काढलेल्या संभाजीच्या आज्ञा प्रसिद्ध आहेत. ''मौजे चिंचवड प्रांत पुणे येथील मोरया देव याजकडे चालत होता. त्यांना लष्कराकडून कोणत्याही प्रकारे रहदारीच्या मार्गाचा त्रास होऊ नये म्हणून काढलेली संभाजीची आज्ञा''(३२) रामदास रामदासी यात संभाजीची अनेक पत्रे चाफळ व जांब येथील देवस्थानाची व्यवस्था सुरळीत चालावी व त्यांना लष्कराकडून त्रास होऊ नये, म्हणून काढलेल्या आज्ञा प्रसिद्ध आहेत.'' संभाजीने वेदशास्त्रसंपन्न अशा १६ ब्राह्मणांना कऱ्हाड प्रांतात मौजे झुबी ता. हवेली सुभा प्रांत कऱ्हाड हा गाव देह १ एकरास इनाम सर्वमान्य करून दिल्याचा उल्लेख आहे.(३३)

''मोरेश्वर पंडितराव याचे शके १६०८ चैत्र शुद्ध छत्रपती संभाजी महाराजांच्या कारकिर्दीतील एक जाहीर आज्ञापत्र आहे. गंगाधर रामचंद्र कुळकर्णी यांना बलात्काराने बाटविले व तीन महिने कैदेत ठेवले होते. त्या ब्राह्मणाला स्नानसंध्यादि कर्मे करण्याचा अधिकार देण्यात आला. (३४)पूर्वीच्या गंगाधर या नावाने त्याला शुद्ध करून घेण्यात आले.

बाटविलेल्या हिंदूंना प्रायश्चित्त देऊन शुद्ध करून घेण्याचे शिवाजी महाराजांचे धोरण संभाजीने पुढे चालू ठेवलेले दिसते. संभाजीचा धर्माभिमान कसा होता हे जदुनाथ सरकार यांच्या हाऊस ऑफ शिवाजी यातील या पत्रावरून कळून येईल.

**युवराज संभाजी -**

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकापर्यंत संभाजीबद्दल सर्वांची भावना

भावी युवराज म्हणूनच होती. चिटणीस बखरीत युवराज अनीतिमान असल्यास काय होते हे सांगताना राजाराम व संभाजी यांचा अनुक्रमे राजपुत्र व युवराज म्हणूनच उल्लेख केलेला आहे.(३५) ''राज्याभिषेकाच्या वेळी पट्टराणी यासी पटबंधन करुन सोयराबाई बैसली. संभाजी महाराज समीप बैसले.'' असाही उल्लेख चिटणीस बखरीत आहे. चित्रगुप्त बखरीत संभाजीला युवराज म्हणून जरी म्हटले नसले तरी ''तुम्ही राज्याधिकारास योग्य तुम्ही वडील पुत्र राज्याधिकारी राहणे.'' असे उल्लेख आहेत.(३६) ''शिवाजी महाराज यांस राज्याभिषेकसमयी पटबंधन झाले तेव्हा संभाजी राजाही युवराज म्हणून वारस झाले.'' (३७) असे वा.सि. बेंद्रे आपल्या 'छत्रपती संभाजी' मध्ये म्हणतात. इंग्रज वकील ऑक्झींडन हा यावेळी उपस्थित होता. त्याने राज्याभिषेकाच्या निमित्ताने शिवाजी महाराजांबरोबर संभाजीस अहेर केला. अहेराच्या वस्तू अशा

| | |
|---|---|
| दोन जाज रवकचम सलकडी | रु. १२५ |
| एक आठ हिऱ्याची अंगठी | रु. २५० |
| | रु. ३७५ (३८) |

**संभाजीची अस्थिरता-**

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकापर्यंत महाराज व संभाजी यांच्यात कोणत्याही तऱ्हेचा दुरावा नव्हता. राज्याभिषेकापासून संभाजीच्या मनात स्वतः युवराज असल्याची भावना दृढ झाली. संभाजीवर लहानपणापासून जिजाबाई व शिवाजी महाराज यांच्याकडून चांगले संस्कार झाले असले तरीही वाढत्या वयाबरोबर अधिकाराची जाणीव, मोगली संबंधापासून आलेले विलासी षौक याजपासून संभाजी मुक्त राहू शकला नाही. वारंवार होणाऱ्या शहजादा मुअज्जम याच्या भेटीतून व मोगली वैभवाच्या आकर्षणापासून संभाजीवर वेगळेच संस्कार होऊ लागले. महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळी संभाजी १७-१८ वर्षांचा म्हणजेच तारुण्यात पदार्पण केलेला युवक होता. युवराज म्हणून जशी अधिकाराची भावना संभाजीच्या मनात रुजली तशी अधिकारातून येणाऱ्या जबाबदारीची जाणीव मात्र त्याला येऊ शकली नाही. इ.स. १६७५ नंतर महाराज साताऱ्याला आजारी पडले. आणि संभाजीच्या दुर्वर्तनाला चहूबाजूने वाचा फुटू

लागली. शिवाजी महाराजांना संभाजीच्या गैरवर्तनाची माहिती सांगण्याची हिंमत सावत्र मातांची व अष्टप्रधानांची झालेली दिसत नाही. स्वत: संभाजी निर्बुद्ध व आळशी नव्हता. त्याचा धीटपणा, शौर्य हे राज्योपयोगी गुण महाराजांच्या नजरेला आलेले होते. तसेच संभाजी सुशिक्षित, सुसंस्कृत व राज्यकारभार जाणणारा होता. त्याचे गैरवर्तन हे त्या काळातील नीतिमत्तेपासून फारसे वाईट होते असे म्हणता येणार नाही. परंतु संभाजीवर ज्या प्रकरणाचा आरोप करण्यात आला (इतिहासात उल्लेख नाही.) ते प्रकरण ब्राह्मण जातीतील स्त्रीबद्दल घडल्यामुळे (गोदावरी प्रकरण) त्याची दखल घेणे भाग पडले. इ.स. १६७४ पर्यंत जिजाबाई जिवंत होत्या. त्यांच्या उपस्थितीत सोयराबाई आपल्या मुलाला वारसाहक्क मिळावा याबद्दल काहीही बोलण्याची शक्यता नव्हती. जिजाबाईचा आपल्या सर्व सुनांवर व राजमंडळावर वचक होता. ''जिजाबाईच्या मृत्यूनंतर संपूर्ण राजमंडळावर व गृहमंडळावर आपल्या अस्तित्वाने, व्यक्तिमत्त्वाने, अधिकाराने वचक ठेवणारी व्यक्ती राजमाता निधन पावल्यामुळे गृहकलहास वाचा फुटली. सावत्र मुलाचा द्वेष वाटणे, स्वत:च्या मुलाबद्दल प्रेम वाटणे हा नैसर्गिक स्वभाव आहे. त्यामुळे संभाजीच्या दुष्कृत्याबद्दल थोडीशी कुणकुण लागल्या बरोबर सोयराबाईने स्वत: राजमाता होण्याचे स्वप्न पाहण्यास प्रारंभ केला.

स्वत: शिवाजी महाराज या सगळ्या प्रकरणात लक्ष घालत असल्यामुळे येसूबाईला काहीही बोलता येत नसावे. तिच्या मनाची होणारी उलघाल तिने कुठेही व्यक्त केली नसली तरी कल्पना येऊ शकते.

कर्नाटकाच्या स्वारीच्या वेळी रायगडाच्या परिसरातील राज्याच्या ज्येष्ठ व श्रेष्ठ अधिकाऱ्यांच्या संपर्कापासून संभाजीला दूर ठेवण्याचा विचार शिवाजी महाराजांनी केला. स्वत: महाराज संभाजीला स्वत:बरोबर स्वारीवर घेऊन जाऊ शकले असते. परंतु रायगडावरील हालचालीवर काही प्रमाणात वचक राहावा म्हणून, शिवाय येसूबाई गरोदर असल्यामुळे तिच्यासह संभाजीला शृंगारपूरच्या कारभारावर येसूबाईच्या माहेरी ठेवण्यात आले. पिलाजी शिर्के (येसूबाईचे वडील) सारखा अनुभवी अधिकारी शृंगारपुरातच होता.

संभाजी शृंगारपुरात समाजकंटकांच्या तावडीत सापडला व अधिकच

उच्छृंखल बनला. हा दैवदुर्विलास म्हटला पाहिजे. १६७८ ला संभाजीने स्वत:ला शृंगारपूरला कलशाभिषेक करवून घेतला. (४०)

कर्नाटकाच्या स्वारीहून परत आल्यावर शिवाजी महाराजांना संभाजीच्या दुर्वर्तनाबद्दल अनेक गोष्टी कळल्या. तसेच संभाजीचा मोगलांशी चाललेला पत्रव्यवहारही महाराजांच्या नजरेस आला. महाराजांनी संभाजीला शृंगारपूर सोडून सज्जनगडावर जाण्याची आज्ञा केली. (४१) शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील फार मोठी शोकांतिका म्हणजे स्वत:च्या मुलाने -युवराज संभाजीने मोगल अंमलदार दिलेरखान याच्याकडे पळून जाणे. पाच हजारी मोगल मनसबदार म्हणून मोगल शाहजाद्याकडून संभाजीला पाठवण्याचा महाराजांचा उद्देश वेगळा होता. मोगल दरबारची माहिती संभाजीमार्फत आपल्याला कळेल असे महाराजांना वाटत होते. परंतु राज्याचा वारस फितवून आपल्या बाजूस वळवून मोगलांनी शिवाजी महाराजांचा डाव त्यांच्यावरच उलटविला.

इ.स. १६७९ च्या डिसें. मध्ये संभाजी मोगलांकडून पन्हाळ्याला परत आला. त्याची समजूत घालण्याकरता शिवाजी महाराजांनी त्याची दीर्घकाल भेट घेतली. (४२) आपण काही काळ जगू राज्याची इष्ट घडी बसवून राज्यरक्षणाच्या योजना अमलात आणून राज्यात माजलेल्या गैरसमजुतीवर तोडगा काढू, अशी महाराजांची योजना होती. परंतु त्यांच्या आकस्मिक मृत्यूने सर्व अनिर्णित राहिले. मोरोपंत व अण्णाजी महाराजांच्या मृत्युसमयी रायगडावर नसल्यामुळे राजारामाच्या मंचकारोहणाला काही काळ लागला. याचा फायदा संभाजीला मिळाला. ही सुद्धा एक अकल्पनीय ऐतिहासिक घटना म्हणावी लागेल.

महाराजांनी मरण्यापूर्वी एक अधिकृत आज्ञापत्र प्रधानांसाठी ठेवले होते. असे रायरीची बखर म्हणते. (इंग्रजी भाषांतर)

शिवाजी महाराजांच्या आकस्मिक मृत्यूमुळे निर्माण झालेल्या संभाजी, अष्टप्रधान मंडळ, सोयराबाई, राजाराम या सगळ्यांच्या राज्यप्राप्तीच्या कलहात, स्थितप्रज्ञ राहून राज्यावर आलेले संकट दूर करून मराठी राज्याला वैभवसंपन्न करण्याकरता, येसूबाईला अनेक प्रकारे आपली कार्यकुशलता दाखवावी

लागली. संभाजीला मायेच्या ममतेने व जबाबदारीने तिने या सगळ्या गुंत्यातून काढून कसे कार्यप्रवण केले हे पाहणे महत्त्वाचे आहे.

## संदर्भ


१ अ. काळे द.वि. छत्रपती शिवाजी महाराज पृ. २३८.

ब. आपटे द.वि. शिवचरित्र प्रदीप. पृ. १८
दिवेकर म.स., (संपा.)

२. गाडे करिना ऐतिहासिक **संकीर्ण साहित्य खंड १**

३. सभासद बखर. पृ. १२.

४. केशव पंडित राजारामचरितम् पृ. १४२
दंडनीती बा. ० पृ. ६१.

५. चिटणीस बखर. पृ. २७१-७२

६. बुधभूषण काव्य. पृ. २

७. मे.-७४ द्वितीय संमेलन वृत्त शके १८२६.

८. सरदेसाई गो.स. मराठी रियासत (उग्रप्रकृती संभाजी)पृ. १०३

९. चित्तपावनांची सामाजिक मूळ पीठिका राजवाडे ले० पृ-६०-६७

१० अ. सप्तप्रकरणात्मक चरित्र पृ. १७५

ब. आ.बा. चांदोरकर. (संपा) शिवशाहीचा लेखनालंकार.

११. अॅबे कॅरे

१२. वाडा सनदा पत्रे पृ. २१७.

१३. पवार आप्पासाहेब संपादक. ताराबाईकालीन कागदपत्रे खं. १ला

१४. ऐतिहासिक लेखचर्चा भाग-२ रा-३ रा.

१५. पगडी सेतू माधवराव - मोगल मराठे। शिवाजीची युक्ती १६७५

१६. शकावली.

१७. शिवदिग्विजय बखर. पृ. १५२-५४.
शिवदिग्विजय बखर पंत अमात्य बावडा दप्तर भाग १ ला.
सबनीस के.गो. (संपा).

१८. खाफिखान.
राजवाडे खंड ८ पृ. १३-१४
१९. सप्तप्रकरणात्मक चरित्र पृ. १७५
२०. औरंगजेब नामा पृ. ६३
२१. राजवाडे खंड ८ लेखांक १६.
२२. शिवकालीन पत्र सार संग्रह पृ. ३२३
२३. शिवचरित्र प्रदीप पृ. २४.
२४. शिवचरित्र प्रदीप पृ. ५२ शकावली.
२५. मराठ्यांच्या इतिहासाची साधने. खंड ८-२५ पृ. २१
२६. शिवकालीन पत्रसार संग्रह क्र. १५३५
२७. शिवकालीन पत्रसार संग्रह क्र. १५३६ पृ. ४४०
२८. ऐतिहासिक लेखचर्चा भाग २ व ३.
२९. राजवाडे संशोधन ग्रंथमाला. पृ. १२९
३०. भारत इतिहास. सं०.मे. ० पुस्तक १२
३१. १६ मार्च १६८६ संमत पत्र राजवाडे खंड ८ वा.
३२. श्री समर्थ रामदासांची कागदपत्रे ले० ४२ पृ. ७२
३३. मराठ्यांच्या इतिहासाची साधने. राजवाडे पृ. १८-४२६
३४. मेई ७४ द्वितीय संमेलन वृत्त श. १८३६.
३५. चिटणीस बखर पृ. २७०-३३०.
३६. चित्रगुप्त बखर पृ. १३२-१३९.
३७. बेंद्रे वा.सि. संभाजी महाराज पृ. ४५.
३८. Duten Records. Vol. XXXIV Letters from India, 1674-1679
३९. शिवचरित्र प्रदीप पृ. ५३-४६१.
४०. परमानंद काव्य पृ. ९ श्लोक ६२.
४१. परमानंद काव्य पृ. ८०-८१.
४२. शिवचरित्र प्रदीप पृ. ३०.



## : ४ :

# छत्रपती संभाजी

### संभाजी - अष्टप्रधान संघर्ष -

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी व राजप्रतिनिधी यांच्यातील संघर्षाने तीव्र रूप धारण केले. महाराजांनी मरण्यापूर्वी एक अधिकृत आज्ञापत्र प्रधानांसाठी ठेवले होते असे रायरीची बखर (इंग्रजी भाषांतर) नमूद करते. संभाजीने रायगडावर येऊन राज्यसूत्रे आपल्या हातात घेतली व १६ जाने. १६८० ला संभाजीने राज्याभिषेक करून घेतला. या निमित्ताने कैदेत ठेवलेल्या सगळ्या प्रधानांची मुक्तता करण्यात आली. मोरोपंतांच्या मृत्यूनंतर त्यांच्या मुलाला-निळोपंताला अधिकारपद देण्यात आले. यानिमित्ताने संभाजी व राजप्रतिनिधी यांच्यातील वादळ शमले असे वाटले. परंतु यानंतरही संभाजीविरुद्ध कट होतच होते. अकबराकरवी संभाजीला विषप्रयोग करण्याचा कट फुटल्यामुळे त्यात संबंधित असलेल्या अण्णाजी दत्तो, बाळाजी आबाजी, हिरोजी फर्जंद या लोकांना ठार मारण्यात आले. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजी गादीवर येऊ नये म्हणून प्रयत्न करणारा गट राज्यात होता हे यावरून सिद्ध होते.

### छत्रपती संभाजी-

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर क्रियाकर्म साबाजी भोसले याजकडून करवून घेण्यात आले होते. ही गोष्ट संभाजीपासून लपून राहणे शक्य नव्हते. संभाजीने पन्हाळ्याचा बंदोबस्त करून रायगडाकडे कूच केले. सोयराबाई व अष्टप्रधान यांनी राजकारण करून संभाजीला राज्य देण्याचे नाकारले होते. या सर्व गोष्टींचा परिणाम संभाजीवर आला. आपण स्वत: ज्येष्ठ पुत्र जिवंत असता साबाजीकडून क्रियाकर्म केले याचे दुःख संभाजीच्या मनात होते. राजकारणी लोकांचा बंदोबस्त करण्याकरता आपले सासरे पिलाजी शिर्के यांना पाच हजार सैन्यासह संभाजीने पाचारण केले. ''संभाजी रायगडावर येताच सोयराबाई व तीन मातांचे त्याने सांत्वन केले.'' (१) राजाराम यावेळी फक्त दहा वर्षांचा

होता. "राजारामाला ............... मंत्र्यांच्या घरी चौक्या बसविल्या गेल्या तरी कोणत्याही प्रकारचा त्रास दिला जात नाही." (२)दहा वर्षांचा राजाराम यास संभाजी प्रेमाने वागवी. अशी रायगडावरील माणसांनी बातमी दिली आहे. १९ जुलै १६८० च्या मुंबईच्या पत्रात,

> His young brother he used with all
> kinds and continues as yet
> so to do.............(3)

१८ जून १६८० ला रायगडावर येऊन संभाजीने सर्व सूत्रे आपल्या हातात घेतली. मधल्या अंदाधुंदीने पुतळाबाईस सती जाता आले नव्हते. त्यामुळे २७ जून १६८० रोजी पुतळाबाईने अग्निप्रवेश केला. संभाजीने पुन्हा शिवाजी महाराजांचे क्रियाकर्म करून दानादि दिले. २० जुलै १६८० ला संभाजीचा मंचकारोहण विधी झाला.

विधियुक्त राज्याभिषेक करण्यापूर्वी संभाजीने समर्थ रामदास स्वामींचा आशीर्वाद मागितला, "शंभुराजे यांच्या अभिषेकार्थ श्री समर्थास विनंती करावयास दिवाकर गोसावी समवेत राधो अनंत सज्जनगडास गेले. रामदास स्वामींना वस्त्रे, देवास पोषाख, जवाहीर कारकून याजजवळ पाठविले. (४)

**राज्यभिषेक समारंभ-**

"समारंभ पंचमी, षष्टी, सप्तमी (दि. १४ ते १६) तीन दिवस चालू होता. दि. २०-१२-१६८० ला संभाजीने स्वतःची सुवर्णतुला दान केले.(५) यानंतर प्रतापगडावर जाऊन कुलस्वामिनीचे पूजन केले. त्यानंतर राज्याभिषेक विधी पूर्ण झाला. "माघ शु. गुरुवार शके मजकुरी यास (संभाजी) राज्याभिषेक होऊन सिंहासनारूढ जाले ............... ते समयी अष्टप्रधान जाले ते पूर्वीच होते तेच" असे चिटणीस बखरीत वर्णन आहे.(६)

राज्याभिषेक समयी राजा, पट्टराणी, युवराज, मुख्य प्रधान यांना पट्टबंधन करावयाचे असते. संभाजीला प्रथम मुलगीच असल्याने समारंभात युवराजाची उणीव भासली म्हणून संभाजीने 'पुत्रकामेष्टी' यज्ञ केला. उत्तरेकडील परिस्थिती मोगली आक्रमणामुळे अस्थिर असल्यामुळे राज्याभिषेकाकरता गागाभट्ट येऊ

शकले नाहीत. त्यांनी 'समयनय' नावाचा राज्याभिषेक ग्रंथ लिहून पाठविला. संभाजीने जाणतेपणाने राज्याभिषेकाचे सर्व विधी करून घेतले. इ.स. १६८१, १६ जानेवारीला राज्याभिषेक झाला. त्यापूर्वी संभाजीचा येसूबाईशी समंत्रक विवाह झाला. अनेक अडचणींना तोंड देऊन आपल्या पतीला राज्याभिषेक झाल्याचे पाहून येसूबाईला आनंद झाला.

राज्याभिषेकानिमित्ताने संभाजीची मुद्रा-
श्री शंभो शिवजातस्य मुद्रा द्यौरिव राजते ।
यदंक सेविनी लेखा वर्तते कस्य नोपरि ॥

तसेच भारत इतिहास संशोधन मंडळाच्या अहवाल शके १८३२ सं.पा. खं.चि. मेहेंदळे बी.ए. चिटणीस पृष्ठ ७१ वरील हा शिक्का संभाजीचा आहे. (७)

श्रीमच्छिवभक्त्यु द्रेकादधिगत धरणी समस्त साम्राज्य ।
शंभो छत्रपतेर्मुद्रा मोदप्रदा जयति ॥

वि.का. राजवाडे

संभाजी महाराजांनी मंचकारोहण केल्यानंतर सुंदरीदेवी (तुळजापूरची भवानी) ला वार्षिक नेमणूक पत्र दिल्याचे हे आद्यंत संस्कृत नेमणूक पत्र आहे.

प्रारंभी ''नमस्तुंगाशिरधुचि'' असे श्री शंभु-(शिखर शिंगणापूरच्या श्री महादेव भोसले घराण्याचा कुलदेव त्या) चा नमनाचा श्लोक आहे. त्याखाली महाराजांची पिंपळपानी मुद्रा आहे.

याखालील दोन ओळी स्वत: महाराजांनी आपल्या हाताने लिहिल्या आहेत. त्या अशा .............

॥ मतं मे श्री शिवराजपुत्रस्य श्री शंभुराज ॥

॥ छत्रपते: यद्त्रोपरि लेखितं ॥छ ॥ श्री ॥

यांत भोसले घराण्याचा इतिहास वर्णिला आहे. या पत्रांतर्गत व्यक्तिमुद्रा संभाजीच्याशिवाय सौ. मातुश्री राणी येसूबाई यांची मुद्रा ''श्री सखी राज्ञी जयति'' आहे. असा उल्लेख केल्यामुळे पत्रांतर्गत येसूबाई साहेबांचा सहभाग अवश्य आहे हे सिद्ध होते.

राज्याभिषेकाच्या निमित्ताने संभाजीची मुद्रा-

१. श्री शंभोः शिवजातस्य मुद्रा द्यौरिव राजते ।
यदंकसेविनी लेखा वर्तते कस्यनोपरि ॥

२. संभाजीचा शिक्का-
''श्री मच्छिवभक्तु द्रेकादाधिगत धरणी समस्त साम्राज्य-
''शंभो छत्रपतेमुद्रा मोदप्रद जयति''(७)

**संभाजीचे संघर्ष -**

संभाजीची राज्याभिषेकानंतरची एकूण नऊ वर्षाची कारकीर्द आहे. संभाजीने या वर्षांत क्षणाचीही उसंत न घेता राज्य रक्षण केले.

दि. १-६-१६८१ ला औरंगजेब पुत्र अकबर संभाजीच्या आश्रयास आला. त्यात मुख्य पुढाकार दुर्गादास राठोड याचा होता. अकबर खानदेश जंगलातून महाराष्ट्रात आला. संभाजीचे अधिकारी रायगडाच्या उत्तरेस पाली येथे अकबरास येऊन भेटले. पाच महिनेपर्यंत अकबराचा मुक्काम पाली येथेच होता. संभाजीची मदत या काळात अकबराला होऊ शकली नाही. कारण संभाजी अंतर्गत व्यवस्थेत मग्न होता. या अवधीत दि. ३१-७-१६८१ ला औरंगजेब स्वतः दक्षिणेत बऱ्हाणपूर येथे येऊन दाखल झाला. अकबरास मदत करून, राजपुतांचे सहाय्य घेऊन औरंगजेबाविरुद्ध मोठा डाव रचण्याचे राजकारण करण्यास संभाजीला अवकाश मिळाला नाही.

**संभाजी व सिद्दी -**

सिद्दीला मदत देऊन औरंगजेबाने संभाजीवर पाठविले. इ.स. १६८१ च्या डिसेंबरमध्ये पनवेलपासून चौलपर्यंतचा किनारा सिद्दीने उद्ध्वस्त केला. संभाजीने खुष्कीच्या मार्गाने व समुद्र मार्गाने सिद्दीवर चाल केली. त्यावेळी पोर्तुगिजांनी समुद्र मार्गाने मोगली आरमाराच्या साह्याने संभाजीवर चाल केली. सिद्दी, इंग्रज व पोर्तुगीज एकाचवेळी मोगलांच्या सहाय्याने संभाजीवर मारा करीत होते. औरंगाबादेहून बहादूरखान हा संभाजीवर चालून आला. त्यामुळे सिद्दीवरील मोहीम अर्धवट सोडून संभाजीला औरंगाबादेकडे वळावे लागले.

"जुलै १६८१ ला संभाजीची पत्नी व मुलगी दिलेरखानाने पकडून अहमदनगरच्या किल्ल्यात ठेवली. ही बहुधा संभाजीची द्वितीय पत्नी दुर्गाबाई व मुलगी भवानीबाई ही असावी." (८)ऑक्टो. १६८१ मध्ये संभाजीने या दोघींना सोडवण्याचा प्रयत्न केला.

**संभाजी पोर्तुगीज संघर्ष-**

संभाजीशी वैर वाढवू नये अशी प्रारंभी पोर्तुगीजांची इच्छा होती. २८-७-१६८२ ला संभाजीला पुत्र (शाहू) झाल्याबद्दल अभिनंदनाचे पत्र फ्रांसिक टाव्होरा याने लिहिले होते. (९) पोर्तुगीजांचे एक व्यापारी जहाज सुरतेस जात असता कौल जवळ मराठ्यांनी पकडले. कोकणात मराठ्यांशी मालाच्या ये, जा करण्यावरून बरीचशी कुरबुर सुरूच होती. यावरूनच पुढे त्यांना मोगलांचा पाठिंबा मिळाल्याने संभाजी - पोर्तुगीज संघर्ष वाढत गेला.

नामुष्की पदरात घेऊन गव्हर्नर टाव्हेराने दि. १-११-१६८३ ला जीव वाचवून गोवे गाठले. संभाजीने फोंड्याची मजबुती करून गोव्यावर चाल करण्याची तयारी केली. यावेळची संभाजीची तयारी व तडफ इतकी जबरदस्त होती की, पोर्तुगीज सेंट झेवियरची प्रार्थना करू लागले. "कार्तिकी वद्य ७ म्हणजे १-११-१६८३ ला संभाजीराव वांद्र्याला गेले, गोवेकरांनी कोटात लढा घातला होता. त्यासी लढून वेढा उठविला.......... मार्गशिर्ष मासी कुंभार जुवे घेतले साष्टी बारदेस मारला. (१०)

यावेळी शहाअलम चालून येतो आहे हे कळल्यामुळे संभाजीस मोहिमेवरून परतावे लागले. दि. ४-२-१६८४ ला संभाजीने पोर्तुगीजांशी तह केला. म.म.द.वा. पोतदार पोर्तुगीजांतील संभाजीच्या स्वारीला 'त्याच्या पराक्रमाचे शिखर' या शब्दांत गौरवतात.(११)

**संभाजी - मोगल संघर्ष -**

इ.स. १६८० ते १६८९ पर्यंत मराठा मोगल संघर्ष अव्याहत चालू होता. संभाजीच्या कारकिर्दीत ८-९ वर्षेपर्यंत हा झगडा अनेक आघाड्यांवर सुरू होता. आपल्या सगळ्या सामग्रीसह प्रचंड सैन्य, अनुभवी सेनापती, मुलगे, नातू आणि इतर आप्तसंबंधीयांना घेऊन स्वतः औरंगजेब दक्षिणेत उतरला होता. मराठे घरात

घुसलेल्या या शत्रूशी नेटाने लढत देत होते. परंतु सरळ सरळ सामना करून यश मिळत नाही असे पाहिल्यानंतर औरंगजेबाने फितुरीचा आश्रय घेतला. मुंबईकराचे संभाजीच्या लष्करी तयारीविषयीचे पत्र असे आहे. ''मोगली सैन्य येणार म्हणून सर्व बुरुजांवरून पुष्कळ तोफा ठेवल्या आहेत. परंतु मोगली सैनिक संभाजी राजाच्याविरुद्ध चालून येण्यास धजत नाहीत.''(१२) संभाजीने युद्धाच्या तयारीत कोणत्याही तऱ्हेने कसूर केलेली दिसत नाही.

खाफीखान लिहितो, ''फौजेत धान्याचा दुष्काळ पडला. महर्गतता इतकी वाढली की कधी कधी तीन तीन चार चार रुपये देऊनही एक शेर गव्हाचे पीठ मिळेनासे झाले. ........... एकाही सरदाराच्या तबेल्यात स्वारीयोग्य असा एकही घोडा राहिला नाही. मग बिचाऱ्या शिपायांची काय कथा ?''१२ब

कल्याद, औरंगाबाद, चांदा, बेंदर, फलटण व रायगड या सर्व भागात संभाजीने बादशहाशी त्याच्या प्रचंड सैन्यानिशी वर्षभर लढा दिला. इ.स.१६८८ त पावसाळा संपल्यानंतर मोगल - मराठे युद्धाला आमनेसामने तोंड लागणार होते. याच सुमारात शिर्क्यांचे बंड उपस्थित झाले. ''शके १६१० कार्तिक, ऑक्टोबर, नोव्हेंबर कवी कलष याजवरी शिर्के पारखे झाले. कलश पळोन खिळणीयावर गेले. तेच मासी संभाजीराजे रायगडावरून कलषाचे मदतीस आले. समागमे स्वारी (संगमेश्वरी) सिरकीयांसी युद्ध करून त्यास पलवून आपण खिळणियावर आले.'' अशी नोंद जेधे शकावलीत आहे. (१३)

**संभाजीचा बाणेदार शेवट-**

रायगडी येसूबाई व इतर कुटुं ब कबिला होता. परंतु मोगलांच्या हालचाली महाराष्ट्रात वाढत असताना रायगडला येताना वाटेत संगमेश्वरी मुक्काम संभाजीने का केला हे गूढ अजूनही उलगडलेले नाही. भीमसेन सक्सेना हा बहादुरगडाच्या बादशाही छावणीत हजर होता. तो म्हणतो, ''रायगडला संभाजीने जायचे ठरविले होते. त्यासाठी त्याने आपले कुटुंबीय आणि सैन्य यांना पुढे रवाना केले होते. संभाजी स्वत: कवी कलष ब्राह्मण याची वाट पाहत बसला. संभाजी कवी कलषाला आपला गुरू समजत असे. कवि कलष हा पूजा व अनुष्ठान करण्यात गुंतला होता. आकस्मितपणे संभाजी आणि कवि कलष हे शाही फौजांच्या हाती सापडून कैद झाले.''(१४)

"संभाजीस पकडले त्यावेळी कबजी हे हिडीस अनुष्ठान करीत होता," असे मराठी दप्तरमध्ये स्पष्ट म्हटले आहे.(१५) हे अनुष्ठान महाराणी येसूबाईला व इतर अष्टप्रधानांना मान्य नसल्यामुळे रायगडी करणें शक्य नव्हते. संभाजी अष्ट प्रधानांना जुमानत नसला तरी येसूबाईबद्दल त्याला प्रेमयुक्त आदर होता. श्री.शि.ल. करंदीकर म्हणतात, "बहुत करून येसूबाईने कवी कलशाला आपली हिडीस अनुष्ठाने रायगडाला करण्याची बंदी केली होती." (१६) संगमेश्वरला तशी संरक्षणाची योजनाही केलेली दिसत नाही. कोल्हापूर पासून ७०-८० मैलांचे अंतर कापून मुकर्रबखान हा अचानक संगमेश्वरला येऊन पोहोचला. संगमेश्वरच्या चकमकीत म्हलोजी घोरपडे मारला गेला. कलुषाच्या हाताला बाण लागला व संताजी आणि खंडोबल्हाळ पळून रायगडी गेले. यावरून परिस्थितीचे गांभीर्य लक्षात येते. संभाजी स्वत:ही उत्तम घोडेस्वार होता. परंतु गाफील अवस्थेमुळे पळून जाऊ शकला नाही. तसेच तो उत्तम योद्धा होता. तेव्हा पकडता त्याने सहज ३-४ लोकांना सहज लोळवले असते. परंतु त्याच्या अंगावर एकही वार नव्हता.म्हणजेच तो युद्ध करण्याच्या अवस्थेत नसावा असे वाटते. मुकर्रबखानाचा मुलगा इखलासखान हा आपल्या शूर सहकाऱ्यांसह वाड्यात घुसला. आणि त्याने संभाजीच्या केसांना धरून ओढत मुकर्रबखानाजवळ आणले, असे यदुनाथ सरकार म्हणतात. संभाजीने विलासात मग्न असणे आणि मोगलांनी अनपेक्षित हल्ला करणे या गोष्टी जुळून आल्या आणि संभाजी मोगलांचा कैदी बनला.

"माघ वद्य सप्तमी शुक्रवार सन १६८९ फेब्रुवारी १ संभाजी राजे व कवि कलश .......... उभयतास जिवंतच धरून नेलं. वरकड लोक पळून रायगडास गेले."(१७)

संभाजी व कलश यांना पकडल्यानंतर संगमेश्वराला औरंगजेबाने आपले लष्करी ठाणे स्थापन केले. मुकुर्रबखानाने संभाजीला मोठ्या बंदोबस्ताने मराठी मुलूखातून बाहेर काढले. या आकस्मित घटनेने मराठे एवढे स्तिमित झाले की, वाटेत संभाजीला सोडवावयाचे प्रयत्न झाले नाहीत.

बादशहाने आज्ञा केली की, संभाजीला बेड्या घालून आणावे. बादशाही छावणी बहादुरगड इथे होती. १५ फेब्रु. १६८९ रोजी कैद्यांना लष्करात आणण्यात

आले. बादशहाने हुकूम केला, "संभाजीला लष्करापासून दोन कोसांवर तख्ता कुलाह (इराणमध्ये गुन्हेगारांना घालीत तसा पोषाख आणि विदूषकासारखी उंच लष्करी टोपी) चढवावे. त्यांना तऱ्हेतऱ्हेने पीडा देऊन त्यांची विटंबना करावी, त्यांना उंटावर स्वार करावे आणि ढोल बडवीत आणि शिंगे कर्णे वाजवीत त्यांना लष्करात आणि दरबारात आणावे. मुस्तेदखानाने लिहिलेल्या हकिकतीचा सारांश असा आहे. याप्रमाणे संभाजीला लष्करातून धिंड काढून फिरविण्यात आले.

"(११ मार्च १६८९ ) यानंतर त्यांना त्यांच्या दहा अकरा साथीदारांसह अनन्वित छळ करून ठार मारण्यात आले. नरकवासी संभाजी आणि कवि कलश यांच्या तमाम शरीरात पेंढा भरण्यात आला." "फाल्गुन व ३० (११-३-१६८९) रोजी म्हणजे पकडल्यापासून सुमारे सवा महिन्याने औरंगजेबाने तुळापुरी संभाजी राजे व कवि कलष यांचा शिरच्छेद केला." (१९)

संभाजी राजाचा असा शेवट झाला. मोगल बादशहाने त्याचे हाल हाल केले. पण संभाजीच्या तोंडी शरणागतीची भाषा नाही, निराशेचा उद्गार नाही. हा त्याच्या चरित्रातील अद्भुत भाग आहे. औरंगजेबासमोर त्याने मान वाकविली नाही. यावरून शौर्य, साहस, बेडरपणा इत्यादी संभाजीचे गुण दिसून येतात. स्वतःच्या हातून घडलेल्या अनेक प्रमादांचे प्रायश्चित्त त्याने पुरेपूर भोगले. आपण गाफिलपणाने भलतीच गोष्ट करतो, याची जाणीव त्यास असल्यामुळे शिक्का मोर्तब तो येसूबाईच्या ताब्यात ठेवी; असे बखरकार म्हणतात. (२०)

खुद्द खाफीखान म्हणतो, "परमेश्वरी संकेत असा ठरला होता की त्या दुष्टांनी सुरू केलेल्या उच्छादाची मुळे दक्षिणेतून उपटली जाऊ नयेत, आणि बादशहाची उरलेली हयात मोहीम करण्यात आणि किल्ले घेण्यातच जावी."(२१) "आपल्या राजाच्या मरणाचा प्रतिशोध घेण्यासाठी सर्व मराठी राष्ट्र सशस्त्र होऊन उठले. संभाजी राजाच्या या आत्मसमर्पणाच्या अंतिम महत्कृत्यामुळे त्याच्या सर्व चुका आणि दुष्कृत्ये लोक विसरले, त्याला पूर्ण क्षमा केली." (२२) मोगल- संभाजी संघर्ष संभाजीच्या मृत्यूने संपला. तरी मोगल मराठा संघर्षाने संभाजीच्या मृत्यूने भीषण रूप धारण केले. औरंगजेबाच्या मृत्यूने शेवटी मोगल मराठा - संघर्षाचा शेवट झाला.



# संदर्भ सूची

१. अनुपुराण अ. १६
२. उपरोक्त अ. १४
३. E.R.S. No. 511, P. 314
४. श्री समर्थ रामदासांची कागदपत्रे, ले. ४२, पृ. ७२. रामदास रामदासी.
५. चिटणीस बखर, पृ. ६, ९, शिवचरित्र प्रदीप, पृ. ३१
६. चिटणीस बखर, पृ. ९
७. अ. भारत इतिहास संशोधन मंडळ अहवाल, शके १९३२.
ब. (संपा) मेहेंदळे, ख.चि. चिटणीस बखर, बी.ए. पृ. ९१
८. सरकार यदुनाथ, औरंगजेब.
९. Sen, Historical Records of Goa.
१०. जेधे शकावली.
११. संभाजी चरित्र, वा.सि. बेंद्रे, पृ. ५७७
१२. अ. छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, पृ. ९१
ब. खाफीखान.
१३. शिवचरित्र प्रदीप पृ. ३४, जेधे शकावली.
१४. भीमसेन सक्सेना, हिंदवी स्वराज्य आणि मोगल, सेतु माधवराव पगडी, पृ. ८४
१५. मराठी बखर
१६. दि राईज अॅण्ड फॉल ऑफ मराठा पॉवर, पृ. २६०.
१७. संभाजीकालीन कासार संग्रह, संभाजी शकावली पृ. ११९.
१८. सेतु माधवराव पगडी, हिंदवी स्वराज्य आणि मोगल पृ. ८५.
१९. सरदेसाई, उग्रप्रकृती संभाजी, पृ. ९७.
२०. उपरोक्त, पृ. १०३.
२१. सेतु माधवराव पगडी, हिंदवी स्वराज्य आणि मोगल. पृ. ८८.
२२. हिंद पदपादशाही या ग्रंथातून सावरकर- छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, पृ.४२०

: ५ :

# महाराणी येसूबाई

## येसूबाईवरील जबाबदारी-

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर निर्माण झालेल्या वारसासंबंधीच्या प्रकरणात येसूबाईच्या मुत्सद्देगिरीची झलक स्पष्ट होते. संभाजीकडे बघण्याच्या शिवाजी महाराज व येसूबाईंच्या दृष्टिकोणात कमालीची तफावत होती. शिवाजीला मराठी राज्याचा वारस निर्माण करावयाचा होता व येसूबाईला मायेच्या ममतेने व राजकारणातील कारभारी सखी यादृष्टीने संभाजीला मार्गदर्शन करणे आवश्यक होते. म्हणजे येसूबाईच्या कार्यावर मर्यादा येतील म्हणूनच ते काम अतिशय अवघड व जबाबदारीचे होते.

सोयराबाई व राजप्रतिनिधी यांच्या विरोधी कारस्थानामुळे संभाजी संतापाने या सर्वांचा वध करण्याकरता प्रवृत्त झालेला होता. अशावेळी येसूबाईने मोठ्या मुत्सद्देगिरीने त्याला त्या कृत्यापासून परावृत्त केले. करंदीकर म्हणतात,

"The tragedy was however not enacted at this time, the credit must be given to Yesubai." (1)

राजारामाचे राजप्रतिनिधींच्या संभाजीविरुद्धच्या कटात सामील होणे संभाजीला आवडले नसले तरी, संभाजीचे राजारामावर प्रेम होते. संभाजीने त्याला काही काळ नजरकैदेत ठेवले होते. राजाराम संभाजीपेक्षा १५-१६ वर्षाने लहान होता. "१८ जून १६८० ला महाराजांच्या मृत्यूनंतर रायगडावर आल्यावर संभाजीने सोयराबाई व इतर राण्यांचे सांत्वन केले. राजारामाला वस्त्रे प्रावरणे देऊन त्याची प्रेमाने संभावना केली."(२) इ.स. १६८० मध्ये राजारामाचा विवाह प्रतापराव गुजर यांच्या मुलीशी झाला होता. त्यावेळी संभाजी व येसूबाई पन्हाळ्याला होते. विवाहाचे निमंत्रण त्यांना नव्हते. ही गोष्ट मनात न ठेवता प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर राजारामाचा दुसरा विवाह इ.स. १६८३ मध्ये हंबीरराव मोहिते यांची कन्या ताराबाई हिच्याशी संभाजीने लावून दिला. (३) इ.स. १६८३ मध्ये शेख निजाम (मुकर्रबखान) याने मराठ्यांच्या मदतीने राजारामास मोगलांच्या हाती

देण्याचा कट केला होता. संभाजीने कटाची चौकशी करून त्यात सहभागी झालेल्या प्रल्हाद निराजी व इतरांना कैदेत टाकले. पुढे चौकशीचे काम करण्यापूर्वीच संभाजीचा मृत्यू झाला. हे काम राजारामाने पूर्ण करून गुन्हेगारांना शासन केले. (४) राजारामाकडे पाहण्याचा संभाजीचा दृष्टिकोण बदलण्यास येसूबाईचे संभाजीवरील नैतिक वजन कारणीभूत आहे. संभाजी व येसूबाई राजारामाला ममतेने वागवीत. औरंगजेबाच्या विरुद्ध युद्धात स्वराज्यातील किल्ले देखरेखीचे काम संभाजीने राजारामावर सोपविलेले होते.

रायगडी आल्यानंतर रागाच्या भरात संभाजीने बाळाजी आवजी चिटणीस यांची गैरसमजाने हत्या केली. "महाराजांची मर्जी क्रूर. त्यात समय एकप्रकारे पाहून समजावले ते समयी त्यांचे पुत्रास मारावे अशी आज्ञा केली." यावरून महाराजास बाळाजी आवजीचा आग्रह आहे. (असे दिसले.) आधी आपणास मारावे. नंतर पुत्रास करणे, ते करावे ......... तेज परवानगी सांगून बाळाजी आवजी, बल्लाळ व शामजी असे तिघेही हत्तीखाली घालून मारविले. (५) त्यास मारावयास काही कारण नव्हते असे बोलिले व महालात गेले. बाळाजी आवजीचा वध झाल्यानंतर संभाजीची येसूबाईने चांगलीच कानउघाडणी केली. येसूबाई साहेब यांनी "बाळाजी प्रभु मारिले हे उचित न केले, बहुता दिवसाचे व इतबारी, पोख्त थोरले महाराज कृपाळू. सर्व अंतरंग त्याजपाशी होते. चिटणीस राज्याचे व आपले प्राण ऐसे म्हणत आले. वंशपरंपरेने चिटणीसी देऊन पत्र शपथपूर्वक त्यास दिले. हे माहीत असून त्यांनी अपराधही कांही केला नाही. (असे असता) लहानाचे सांगण्यावरून ही गोष्ट कशी केली, सर्व कारकून मारिले, बेदील जहाले, अन्यायही जाहले, एकेक होते तेही ऐसे गेले, पुढे राज्य कसे चालेल इत्यादी बोलली." (६)

येसूबाईने संभाजीला सगळ्या गोष्टींची कल्पना दिली व हे कृत्य गैर कसे होते हे पटवून दिले. तेव्हा संभाजीनेही रागाच्या भरात नको ती गोष्ट केली; चूक झाली, हे कबूल केले व बाळाजी आवजीची दोन मुले खंडो व निळो बल्लाळ यांचे रक्षण करण्याचे काम येसूबाईवर सोपविले. येसूबाईने त्या दोघांचे ममतेने पालन करून त्यांच्याकडून शिक्के करवणे, कागदपत्र, चिठ्ठी लिहवणे ही कामे येसूबाईने करवून घेतली.

संभाजीच्या तापट स्वभावामुळे घडू पाहणाऱ्या अनेक अप्रिय घटनांना येसूबाईने अतिशय कुशलपणे प्रतिबंध घातला. संभाजीची भावनाही येसूबाईबद्दल अतिशय प्रेमाची व कर्तबगारीची होती. तो तिला पूर्णपणे वश होता. संभाजीसारखे आवेशी गृहस्थ जितके क्रोधाविष्ट असतात तितकेच ते प्रेमवशही असतात. येसूबाईने आपल्या पतीचा चांगलाच अभ्यास केलेला दिसतो. आपल्या माहेरच्यांचे (शिर्केशी) चांगले संबंध संभाजीशी घडवून आणले. मराठी राज्याच्या संरक्षणाकरता शिर्केचा अंत:स्थ पाठिंबा तिने मिळवला. (७) या राजकीय स्थित्यंतरामध्ये संभाजीचे स्थान पक्के करण्यामध्ये येसूबाईचा सिंहाचा वाटा आहे. तिच्या सुस्वभावामुळे व राज्याची सर्वांगीण जाण तिला असल्यामुळे प्रत्येकाचा विश्वास संपादन करून घेण्यात व राज्याची घडी पूर्ववत करण्यात येसूबाईने चांगलेच यश संपादन केले.

**श्री सखी राज्ञी जयति - येसूबाई-**

सतत ८-९ वर्षे संभाजी युद्धात व्यग्र असल्यामुळे राजधानीत त्याचे गैरहजेरीत संपूर्ण अंतर्गत कारभार येसूबाईचा जातीने व अधिकाराने पाहत असे. राजपत्रे काढताना नुसते ''आज्ञा'' न म्हणता संभाजीराजे यांची ''राजाज्ञा'' म्हणून हुकूम काढू लागली. (८) याशिवाय तिला दिलेला शिक्काही वापरू लागली. संभाजीने मोठ्या सन्मानाने तिला ''श्री सखी राज्ञी जयति'' असा शिक्का दिला होता. राजधानीत रायगडावर महिनोमहिने संभाजी अनुपस्थित असे. त्यावेळी सर्वत्र बातमी राखणे, गुन्हेगारांची वासलात लावणे, कैदेत दक्षता राखून ठेवणे हा कारभार तिला (येसूबाईला) जातीने करावा लागे.(९)

''शिक्के शिवाजी महाराज जिजाबाईसाहेब याजकडे ठेवून करवीत. त्याप्रमाणे संभाजी महाराज यांनी शिक्के पेटीत घालून देवापाशी ठेवून पेटीची किल्ली वाड्यात असावे, शिक्का करणे ते परवानगीची याद जाली म्हणजे नेऊन समजवावी. नंतर शिक्के तेथेच आणोन करावे. असे येसूबाईसाहेब याजपासून करवू लागले.''(१०) जिजामातोश्रींच्या प्रमाणेच येसूबाईला त्याच योग्यतेने सन्मानित केले जात असे. येसूबाईनेही मोठ्या प्रेमाने समजावून संभाजीकडून अनेक चांगल्या गोष्टी करवून घेतल्या. ''अष्टप्रधानांची कामे

पूर्वीच्याच इसमाकडे ठेवण्यासाठी येसूबाईने आपले वजन खर्च केले असले पाहिजे.'' (११) संभाजीच्या कारकिर्दीत घडलेल्या चांगल्या घटना इतिहासकार येसूबाईच्याच नावावर नमूद करतात. यातच तिच्या कारभाराचे यश आहे हे सिद्ध होते. कलुषाला संभाजीने वाकनीस करून सरकारकुनात म्हणजे अष्टप्रधान मंडळात स्थान दिले. परंतु तो संभाजीचा मुख्य प्रधान कधीच नव्हता. ''मुलकी कारभाराचे कुलमुख्यत्यारपद महाराणी येसूबाईकडेच आरंभापासून होते. ते शेवटपर्यंत तिच्याचकडे होते.(१२) कलुषापेक्षासुद्धा संभाजी हा येसूबाईच्या आज्ञेत जास्ती होता. स्वतःच्या स्वभावाची त्याला कल्पना असल्यामुळे तो आपल्या सुविद्य पत्नीवर - येसूबाईवर विसंबून असे. ''मुलकी कारभार येसूबाईच्या स्वतंत्र शिक्क्याने चाले. त्यावर ''सखी राज्ञी, सचिव'' अशी स्वतःला येसूबाईने विशेषणे लावून घेतली आहेत.''(१३)

संभाजीच्या कारकीर्दीत सैन्यापासून देव-देवस्थानाला काहीही उपद्रव होऊ नये याची काळजी येसूबाईने घेतली होती. याबाबतचे चाफळचे अभयपत्र उपलब्ध आहे.

हे पत्र येसूबाईने चाफळ येथील दिवाकर गोसावी यास लिहिलेले आहे. सैन्यापासून यात्रेकरूंना कोणताही त्रास होऊ नये असे ती या पत्रात नमूद करते. या पत्रावर येसूबाईची सही व शिक्का आहे. यांवरून तिच्या अधिकाराची कल्पना येऊ शकते.(१४अ)

लेखांक ६७) १६०८ फाल्गुन वद्य ११ (अस्सल- मोडी

रघुनाथ




तीर्थस्वरूप दिवाकर गोसावी

ई कौलनामे सौभाग्यवती राजश्री बाईसाहेब दामदौलतहु बजानीब मुकाम स्थळ चाफळ का नाणेघोल सु ॥ सबा सन हजार १०९६ सगावैव अलफ दिल्हे अभयेपत्र ऐसे जे श्री देवाची यात्रा आली आहे. यात्रेस लोक यावयास अनमान करीताती की आपले लोक दौडी करुन यात्रेस तसवीस देतील ऐसीयास अभयेपत्र

अलियाने + + + + + + + + देवाचा मोहछाये करीतील म्हणौन हुजूर मालूम जाले. त्यावरुन यात्रेस अभयपत्रे दिल्हे आहे. आमचे तर्फेने कोणी वाटे जाणार नाही. गावोगावी कागद पाठवून यात्रेकरी बोलावून श्री चा समारंभ करणे आमचे अभये असे व मौजे मजकुरीचे सीगणवाडी श्री चे इनाम स्थळ आहे. जैसे सालाबाद चालिले आहे तेणेप्रमाणे आपले ही पत्र पाहिजे. हमणौन राजश्री माधव गोसावी यांनी सांगितले तेरी आमचे ही अभयेपत्र आहे. देवाचे इनाम स्थळ तुमचे अध्येन आहे. आमचे तर्फेने आजार लागणार नाही. मार्तब सुद देवाचा प्रसाद पाठविला तो आम्हास पावला मो



मोर्त

व सुद

तेरीख २४ माहे रबिलाखर.

संभाजी युद्धावर असताना येसूबाई जनतेची काळजी मोठ्या समर्थपणे घेत असे. "ज्वल ज्वलन तेजस" अशा संभाजीने तिला राणीपणाचा समान हक्क दिला. म्हणजेच येसूबाईच्या कर्तृत्वाचा त्याने गौरव केला असे म्हणावे लागेल. येसूबाईनेही आपल्यावर टाकलेली जबाबदारी व विश्वास तेवढ्याच तोलामोलाने सांभाळून इतिहासात आपले नाव अजरामर केले.

**संभाजीच्या वधानंतर मराठ्यांची स्थिती -**

संभाजी जास्तीत जास्त कलुषाच्या आहारी जाऊ लागल्यामुळे शिर्के यांच्याशी संघर्ष निर्माण झाला. त्यामुळे शिर्के हे औरंगजेबाकडे ओढले गेले.

कोकणात देसाई व शिर्के यांच्यात काही कुरबुरी निर्माण झाल्या. "विठोजी शिर्के याची भावजय काशीबाई यास कोतळूक व मासू हे गांव मोकास संभाजी राजे यांनी दिले असता........ मौजे मासू हा गांव हरबा देसाई यांजकडे होता......... देसाई व शिर्के यांच्या राऊतात कटकटी होऊन ............ देसाई यांनी शिर्केची जागा मोडून टाकली व संगमेश्वरी संभाजी राजे ........... सांगूने शिर्के कडून मोकासा काढून सरकारात गाव ठेवले. (१४ब) शिर्के औरंगजेबाला मिळाल्यापासून संभाजी-शिर्के संबंध बिघडत चालले होते. या पत्रामुळे संभाजी शिर्क्यांवर चालून गेले. शिर्के यांनी संभाजीच्या लोकांत फितुर

केला होता. संभाजी कलुषासह खेळण्यावरून रायगडी येत असता संगमेश्वराला त्यांनी मुक्काम केला. शिर्क्यांचे बंड ही संभाजीच्या आयुष्यातील दुर्दैवाची घटना म्हटली पाहिजे. रायगडावर येसूबाईने कलुषाच्या अनुष्ठानाला बंदी केल्यामुळे संगमेश्वरी मुक्काम करण्यात आला. संगमेश्वरला सरदेसायांचा मोठा वाडा आहे. तिथे कृष्णाबाई व रंगोबा तिचा पुत्र नायक सरदेसाई यांनी ''राजे धनी प्रसंगे करुन आले. जागा मागतात हे समजून रहावयासी जागा वाड्यात दिली. नंतर मोगलांनी कबजीसह हस्तगत करून नेले. ते समयी वाडा जाळीला व गावातील देवळे फोडली, देव बाटवले, याप्रमाणे महारणव झाले.''(१५)

संभाजीला वढू येथे ठार मारण्यात आले. याचा उल्लेख धनकवडीच्या कुलकर्णींच्या कागदपत्रात सापडतो. दि. १७-१-१७१९ चा उल्लेख आहे. ''पादशहा बदू कोरगावी येऊन मुक्काम केला. तेथून लष्कर पाठवून शिवाजी राजे पहिलेच गेले होते. त्याचा लेक संभाजी राजे धरुन आणिला आणि (को किंवा मौजे) वढू कोरेगावात मारिला मग त्याचा लेक शाहू राजा आणि बार्भफा आपल्या जातित ठेविली.'' (१६)

याठिकाणी (वढू) येसूबाई व शाहू यांनी संभाजीचे वृंदावन बांधले. त्याच्या पूजेअर्चेसाठी नैवेद्य, नंदादीप व बाग करून तुळशी लावण्यासाठी भिकाराम गोसावी व वासुदेव भट यांना जमीन इनाम दिली. यासंबंधी दि. १८ जाने. १९१५ चा एक कागद पेशवे दप्तरात आहे. (१७) ''राजमंडल वृंदावने. वृंदावन. महाराज राजश्री कैलासवासी संभाजी राजे स्वामी, दर जागा मौजे वढु ..... भिकाराम गोसावी, वासुदेव भट बिन शामभट धर्माधिकारीनी सुश्रुषेबद्दल देविले आहेत. नैवेद्य व नंदादीप व धूप, बाग करावयास ......... आसामी इनाम जमिनी घातली; आहे.'' वृंदावनजवळ गोविंद ढगोजी मेगोजी हा झाडलोट करून सेवा करीत असे म्हणून शाहूने त्याला काही जमीन इनाम दिली होती. ''गोविंद गोपाळ ढगोजी, मंगोजी हे ति. राजश्री कैलासवासींचे वृंदावन मौजे बढु ........ पावळच्या रानात वृंदावनाची सेवा करीताती......... जमिन बिघे कुलबाब कुल कानु इनाम दिली.'' (१८)

संभाजीच्या मृत्यूनंतर हिंदुस्थानात आसेतुहिमाचल असे औरंगजेबाचे राज्य

स्थापन झाले असे कोणालाच वाटले नाही. आदिलशाही, कुतुबशाही या खिळखिळ्या झाल्या असल्या तरी मराठ्यांमधील स्फुल्लिंग अजून जागे होते. शिवाजी महाराजांच्या वेळेचे अनेक सेनापती अजून जिवंत होते. औरंगजेबाशी लढण्याचा त्यांचा चांगला सराव झाला होता. औरंगजेबाच्या पक्षात असलेल्या इराणी व मध्य आशियातील लोकांशी कसे दळण वळण ठेवावे यामध्ये ते तरबेज झाले होते.

**विचारी व दूरदर्शी येसूबाई-**

संभाजीच्या क्रूर वधाने संपूर्ण मराठा मंडळ अत्यंत शोकाकूल झाले. येसूबाई शाहूसह, राजाराम व मंडळी सगळी रायगडी होती. येसूबाईवर तर दुःखाचा डोंगरच कोसळला. संभाजीच्या राज्याभिषेकानंतर जरा राज्याची घडी बसविण्याचा प्रयत्न होत असताना हा आघात अगदी मर्मी बसला असेच म्हणावे लागेल. मराठी मंडळी - महाराष्ट्रातील मुख्य सरदार, प्रधान, मुत्सद्दी व योद्धे हे सर्व रागाने पेटून उठले. स्वतःचे दुःख गिळून येसूबाईने सर्वांना पुढील मसलतीसाठी रायगडावर बोलाविले. ''संभाजीची स्त्री येसूबाई फार विचारी, शहाणी व दूरदर्शी बायको होती........... शिवाजीस (शाहूस) राज्यावर बसवून राजारामाची मुक्तता करून त्याजकडून राज्यकारभार चालवावा असा घाट तिने घातला. सर्व मराठा मंडळाने एकदिलाने वागण्याशिवाय मार्ग उरला नाही. म्हणूनच यावेळी गृहकलहास थारा मिळाला नाही. यावेळी जमलेल्या मंडळींत निराजी आवजी, जनार्दन हनमंत, खंडो बल्लाळ चिटणीस व रामचंद्रपंत बोरीकर यांसारखी एकापेक्षा एक कर्ती, शहाणी व कारस्थानी मंडळी असताना, महादजी नाईक, पानसंबळ, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे यांसारखे वीरवर असता ते यावेळी आपापसांत कलह माजू देतील हे असंभवनीय होय.''(१९)

येसूबाईने मुत्सद्दी मंडळींसह एकत्र होऊन अशी मसलत केली की, शिवाजी अप्रौढ, त्याजकडून राज्यकारभार आटोपला जाणार नाही. करीता तो प्रौढ होईपर्यंत राजारामास ''राजप्रतिनिधी'' करून त्याजकडून राज्यकारभार व्यवस्थित चालवावा.''(२०)

"मोगलांचे लक्ष रायगडावर केंद्रीत होऊ नये म्हणून राजारामाने रायगडाबाहेर राहून राज्याचे रक्षण करावे असे ठरले."(२१)

शिवाजी महाराजांच्या वेळेची परिस्थिती व शिस्त संभाजीच्या काळी बिघडलेली होती हे लक्षात असल्यामुळे येसूबाईने या सर्व मुत्सद्द्यांना हाताशी धरून राज्यरक्षणाची जबाबदारी स्वत:वर घेतली. या कठीण प्रसंगी येसूबाईने दाखविलेले धैर्य सर्वच इतिहासकारांनी वाखाणले आहे.

**रायगडचा पाडाव-**

२५ मार्च १६८९ मध्ये औरंगजेबाने झुल्फिकारखानास पाठवून रायगडला वेढा घातला. ५ एप्रिल रोजी शुक्रवारी राजाराम पळून प्रतापगडास गेले. (२२) नासीरे आलमगीरीतही राजाराम झुल्फिकारखानाने रायगडास वेढा घातला असता किल्ल्यातून पळाला असा उल्लेख आहे. यावरून रायगडाला वेढा पडल्यानंतर काही दिवसांनी राजारामने रायगड सोडला हे सिद्ध होते. येसूबाई व शिवाजी रायगडावर होते. संभाजीची पत्नी व मुलगा रायगडावर आहे हे कळल्यावर औरंगजेबाने झुल्फिकारखानास रायगडावर पाठविले. झुल्फिकारखानाने आपल्या मदतीला कोकणातून जंजिऱ्याच्या हबशीस बोलवून इ.स. १६९० मध्ये रायगडाला मोर्चे लावले. (२३) गडावरील मंडळींनी १० महिनेपर्यंत दाद दिली नाही. किल्ला मोठ्या शर्थीने लढविला. मासीर ए आलमगिरीप्रमाणे, "संभाजी राजाना (संगमेश्वरी) कैद करण्यापूर्वी इतिकतखान रायगडावर गेला होता असे दिसते."(२४) म्हणजे इ.स. १६८८ च्या डिसेंबरपासूनच झुल्फिकारखानाने रायगडाला मोर्चे बांधायला सुरुवात केली होती. संभाजीला रायगडाहून मदत का येऊ शकली नाही याचे उत्तर यावरून कळून येते.

झुल्फिकारखानाने किल्ल्यातील मंडळींस असे कळविले की, "राजाराम व तुमचे सर्व सरदार निघून गेले आहेत. तेव्हा तिकडून मदत येणे कठीणच. कदाचित मदत आलीच तर, तुम्हाला त्याचा फारसा उपयोग होईल असे वाटत नाही. शिवाय बेगम साहेब यांचे असे म्हणणे आहे की, लहान शिवाजीला मी आपल्या पुत्राप्रमाणे मानले आहे व संभाजीच्या कुटुंबाला माझ्या कुटुंबातील माणसांप्रमाणे वागण्याचा मी निश्चय केला आहे व बादशहाचेही त्यास पूर्ण

अनुमोदन आहे. " (२५) रायगडावर सर्व अधिकारी मंडळींना एकत्र बोलावून सांगितले की, "या उपर किल्ला आपण मोगलांचे हवाली केला नाही तर बादशहा मुसलमान असून हिंदूंचा द्वेष्टा असल्यामुळे तो पुढे काय अनर्थ करील याचा नियम नाही. याकरिता सध्या प्राप्त प्रसंगास डोके देऊन खान व बेगम यांच्या बोलण्यावर विश्वास व दैवावर हवाला ठेवून किल्ला मोगलांच्या हवाली करावा हे बरे वाटते."

येसूबाईने अशी मसलत केली की, "राजारामाने लहान शिवाजी वयात येईपर्यंत सर्व राज्यकारभार शिवाजीच्या नावाने चालवावा." (२६) शाहूचा राज्यावर खरा हक्क आहे हे तिने निक्षून सांगितले. राजाराम व शाहू हे राज्याचे दोन्ही वारस एकत्र सापडू नयेत म्हणून राजारामाला येसूबाईने रायगडाच्या बाहेर जाण्यास सांगितले. यानंतर येसूबाईने दैवावर हवाला ठेवून रायगड मोगलांच्या स्वाधीन केला. संभाजीच्या वधानंतर राजारामाने मंचकारोहण केल्याचा उल्लेख आहे. (९ फेब्रुवारी १६८९) परंतु राजारामाला राज्याभिषेक झालेला नव्हता. "सिंहासनाचे अधिकारी इश्वरे निर्माण केले आहेत." (२७) या वाक्याने येसूबाईने शाहूच्या राज्यावरील हक्कासंबंधी व राज्याधिकारी कोण याविषयी स्पष्ट कल्पना दिलेली चिटणीस बखर सांगते. जेधे शकावलीवरून "रायगडी सल्ला करून मार्गशीर्ष शु. २ रविवार ६ नोव्हेंबर रायगड मोगलांस दिला."(२८) बेंद्रे, सरदेसाई राजारामाने रायगड सोडून जाणे या प्रकारास दोघांमधील हेवादाव्याचा प्रकार मानतात. परंतु पुढील इतिहासावरून राजाराम व येसूबाई संबंध पाहता हे संभवनीय वाटत नाही.

## येसूबाईची मुत्सद्देगिरी-

रायगडाच्या पाडावानंतर येसूबाई लहान शिवाजीसह झुल्फिकारखानाच्या स्वाधीन झाली. तिने खानाला सांगितले राजाराम वगैरे मंडळींनी आपणास सोडून दिलेले आहे. "ती म्हटते याचे वडील चुलते वगैरे मंडळी याला टाकून गेली, तेव्हा आता सर्व भार आपणावरच आहे."(२९)

संभाजीच्या पत्नीने (येसूबाईने) आपली मुले लहान आहेत तर त्यांच्यातर्फे कारभार करण्यास अधिकार आपणास मिळावा अशी मागणी करण्याचा, राज्याचा अधिकार माझ्या मुलांचा आहे व राज्य त्यांना मिळाले पाहिजे असा

दावा येसूबाईने केला. पण मराठे सरदारांनी तिच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले. त्यांनी राजारामाचा पक्ष उचलला. त्यामुळे राणीला (येसूबाईला) मोगलांकडे वळणे भाग पडले, ती आणि तिची मुले मोगलांच्या आश्रयास आली. तिने (येसूबाईने) मोगलांना २२ किल्ल्यांच्या सोडचिठ्या दिल्या.'',(३०)

This determination caused a revolution in the principality for the mother (wife) of Sambhaji, who had sons by her husband, asserted that the crown belonged to them but the commanders turned a deal-ear and sided with Rama Raja (Rajaram) or, to adpot the usual way of speaking of the newly selected Shivaji. In this way the princess was forced to hare recourse to the Mogul, to whom she dilivered hereself up and her sons, along with over twenty two forts, in this way taking the nerve of her compititors.

It seemed as it now the matter was decided for the princess had a number of leading officers on her side - Aurangzeb detained the princess in his camp, and sent to take possession in his own name of the ceded forts.

Stori do Mogar
VOL II page 292.

येसूबाईच्या मुत्सद्देगिरीची मनुचीला कल्पना आलेली दिसत नाही. राजा जयसिंगाच्या ताब्यात गड देताना एकेका गडास दोन नावे देऊन मोजणाऱ्या शिवाजी महाराजांची ती स्नुषा होती. आपण सोडचिठ्ठीने दिलेले गड घेईपर्यंत मोगलांना दम पुरणार नाही याची तिला कल्पना होती. येसूबाईने राजारामासह सर्वांना सांगून ठेवले होते की तुमच्या सर्वांचा एखादे ठाई जमाव पोक्त झाला म्हणजे आम्हास काढून न्यावे, किंवा शत्रूचे प्राबल्य विशेष त्याअर्थी चंदी चंदावर प्रांती दम खाऊन पुन्हा मसलत बनवून राज्य साधनही करणे पडेल तरी करावे.''(३१)

मद्रासकरांच्या पत्रातही ''वेळप्रसंग पडला तर तुम्ही जिंजीस जावे असा सल्ला खुद्द येसूबाईने दिला.'' असा उल्लेख आहे. तो प्रसंग वरील असावा.

**येसूबाई औरंगजेबाच्या कैदेत -**

येसूबाई व शाहू मोगलांच्या कैदेत असता त्यांचे वर्तमान राजारामास पोचविणे

हे काम संभाजीच्या वेळेचे विश्वासू, भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड यांच्याकडे दिले होते. औरंगजेबाच्या कैदेत असता त्यांच्यासारख्या मुत्सद्दी व संशयी अशा मुत्सद्द्याला आपल्याविषयी कोणत्याही प्रकारचा संशय येऊ नये म्हणून येसूबाईला मोठी काळजी घ्यावी लागत होती. राजारामाशी असलेल्या संबंधाचा सुगावा त्याला लागू नये म्हणून येसूबाई मोठ्या मुत्सद्देगिरीने वागत असे.

औरंगजेबाने एकदा थट्टेने शाहूला म्हटले, ‘‘राजे,तुमचे वडील मारले असता तुम्ही नेकीने चालता, तुमचे चुलते यांनी तुमचे राज्य दौलत आटोपून आम्हासी ते लढता त्यास तुम्हास त्याकडे लावून देतो जाले.’’ यावर शाहूने अतिशय मार्मिक व समयोचित असे उत्तर दिले. शाहू म्हणतात, ‘‘पूर्वी आमचे वडील हयात असता त्यास नजर बंदीत ठेऊन आपण राज्य करावे असा राजारामाने बेत केला होता. त्यांचे पश्चात आम्हास आमचे इलाखासुद्धा रायगडी टाकीत आपले कबिलेसुद्धा निघोन गेले.......... गादी व शिक्के आपले नावे करून घेतो.आम्ही स्थानाकडे गेलो असता आम्हांस नजरबंद ठेवतील. आपण (औरंगजेब)त्यांचे पारिपत्य करून आम्हास राज्यावर बसवाल तेव्हा राज्य करू.’’(३२)

येसूबाईने आपल्या निरलस वागणुकीने बादशहा व बेगम यांची मर्जी संपादन केली होती. मराठा राज्याशी आपली कुठल्याही तऱ्हेची फंदफितुरी चालू नाही असे ती भासवीत होती.

शासनाकडील वर्तमान (आतल्या गोटातील) आपणास कळावे म्हणून रायगड सोडताना खंडो बल्लाळाला आपल्या जवळ बोलावून शाहूला त्याच्याजवळ बसवून तिनेच घेतले.’’(३३) औरंगजेबाने येसूबाई व शाहू यांच्या वागणुकीबद्दल संतोष व्यक्त केला. शाहूला अक्कलकोट, इंदापूर, सुपे, बारामती व नेवासे या पाच परगण्यांची जहागीर करून दिली व एक सोन्याची तलवार व शिवाजीची भवानी व अफजलखानाची तलवार अशा बक्षिस दिल्या. औरंगजेबाने शाहूला सप्तहजारी मनसब दिली व येसूबाईला हा कारभार पाहण्याकरता अधिकार दिला.’’ (३४)हा कारभार करण्याकरता येसूबाईला एक शिक्का दिला होता. शाहू अल्पवयी असल्यामुळे येसूबाई तो वापरत असे. १७०७ मधील येसूबाईचा शिक्का रॉयल एशियाटिक सोसायटीच्या लेखमालेच्या १५ व्या खंडातील नवव्या

निबंधात दिलेला आहे. ती फारशी अक्षरे आहेत. फारशी ''येसूबाई इ वालिदा शाहू राजा सन अहद''

मराठी ''शाहू राजाची आई येसुबाई वर्ष पहिले'' (३५) येसूबाई समवेत ज्योत्याजी केसरकर व मोरोपंत सबनीस ही दोन विश्वासू मंडळी होती.

### शाहूचे विवाह-

शाहूचे वय विवाहायोग्य झाल्यावर औरंगजेबाजवळ त्याच्या विवाहाची गोष्ट काढण्यात आली. ज्योत्याजी केसरकर, मोरापंत सबनीस यांना उच्चप्रतीच्या मराठ्यांच्या मुली पाहण्याकरता सांगण्यात आले. रुस्तमखान जाधव यांची कन्या अंबिकाबाई व कन्हेरखंडचे शिंदे यांची कन्या सावित्रीबाई या दोन वधू नियोजित करण्यात आल्या. विवाह समारंभ थाटात पार पडला. नंतर मात्र येसूबाईची परीक्षा होती. औरंगजेब शाहूवर प्रेम करीत असल्यामुळे ''तुझे वडील व आजोबा सगळे चोर; तू मात्र साव (शाहू)'' असे म्हणत असल्यामुळे त्याने नववधू पाहण्याची इच्छा प्रदर्शित केली. येसूबाईने बादशहाला सांगून पाठविले. परंतु त्याच्या इच्छेकरता वधूला पाठवणे भाग होते. मराठा कुळातील स्त्रिया नेहमी पडदा पोशीत असतात. दुसऱ्याच्या नजरेला पडणे लांच्छन समजतात. तेव्हा येसूबाईने बेगमेच्या संमतीने शिंदे यांनी आपल्या मुलीबरोबर पाठविलेल्या एका दासीला दागदागिने घालून शाहूसोबत पाठविले. हीच दासी पुढे विरुबाई म्हणून प्रसिद्धीस आली. (३६) येसूबाईला कैदेत असताना अशा लहान बाबीबद्दलही जागरूक राहावे लागत असे. शाहूला बादशहाने आपल्या राहण्याच्या जागेजवळ ठेवण्याची व्यवस्था केली होती. ''बादशहाने हुकूम केला की, शाहू व इतर काही जणांना आपल्या गुलाल बहार (बादशहाची वास्तव्याची जागा) मध्ये ठेवण्यात येऊन त्याजकडे लक्ष ठेवावे. शाहूच्या शिक्षणाकरता त्याने हुशार माणसे नेमली होती.''(३७) औरंगजेब मुत्सद्दी होता. तो हे जाणून होता की,

आकिबते गुर्ग जादा गुर्ग शवद<br>
गर्चे बा आदमी बुजुर्ग शवद.

(लांडग्याचा बच्चा माणसाबरोबर वाढला तरी तो शेवटी लांडगाच होणार.)(३८)

येसूबाई व इतर मंडळी यांच्याही राहण्याच्या व्यवस्थेसंबंधी औरंगजेबाच्या आज्ञा होत्या. ''संभाजीची आई (शिवाजीची पत्नी) आणि त्याची इतर बायकामुले यांना आदबीने व मानसन्मानाने आणावे.................... जम्द-तुल-मुल्क-असतखान वजीर याच्या तळाजवळ राणी (येसूबाई) च्या तळाचा बाजार बसवण्यात आला. राणीचे नोकरचाकर यांनी तेथे राहावे असे ठरले. सर्वांना वार्षिक वेतने मिळावीत अशी सोय करण्यात आली.''(३९) बादशहा व शाहू एकमेकांना आपल्या वर्तनाने खूष ठेवण्याचा प्रयत्न करीत असत.

औरंगजेब शाहूला भेटवस्तू देत असे. ''बादशहाने शाहूला लाल माणके जडवलेला आरसा, हिऱ्या सोन्याची पंछी (अलंकार), पाच रत्नजडित अंगठ्या व एक रत्नजडीत खंजीर आणि सोनेरी साज असलेला घोडा या वस्तू दिल्या.''(४०)

''राजा शाहू याचे लग्न बहादुरजीच्या मुलीशी ठरवण्यात आले. बादशहाने त्याला एक रत्नजडीत कंबरपट्टा, शिरपेच व दहा हजार रुपयांचा चंगा (अलंकार) या वस्तू दिल्या.'' (४१)

या दिलेल्या सोन्या - हिऱ्याच्या वस्तूंवरून शाहूची परिस्थिती कशी सोन्याच्या पिंजऱ्यातील पक्ष्यासारखी होती याची कल्पना येते.या विलोभनातून शाहूला अलिप्त ठेवून त्याच्यावर सुसंस्कार करण्याचे काम येसूबाईला करावे लागले.

### येसूबाई व राजाराम-

राजाराम व येसूबाई दोघांमध्ये येसूबाई कैदेत असताना पत्रव्यवहार सुरू होता. एकमेकांच्या विशेष वार्ता घेऊन हेर येत जात होते. परंतु औरंगजेबाला याची कल्पना येऊ नये म्हणून ही खबरदारी उभयतांकडून घेतली जात होती. येसूबाई कैदेतून राजारामाला पाठविलेल्या पत्रात म्हणते, ''येथे आम्हास आणवून बेगम यांचे पुत्र शिवाजी राजे हे आपले नातू असे मनात आणून राखून ठेवले आहे. आपला आमचा संकेत आहे. तो परस्परा मनोगत आहे.'' (येसूबाईची मुत्सद्देगिरी तिच्या या वागण्यावरून सहज लक्षात येते.) (येसूबाई राजारामास त्याच्या बायकामुलांना त्याच्याजवळ घेऊन जाण्यास लिहिते.) विशालगडी कुटुंब त्रिवर्ग बायका ठेविल्या त्यास आपण चंदी प्रांती, बाया प्रांती हे चांगले

नव्हे. आपणास पुत्र जाहला याचा आम्हास आनंद वाटतो........... आम्ही येथे सर्वतोपरी सौख्यात आहोत. परंतु अतिविधवत महान संकटात आहोत.(४२) ईश्वरेच्छेने व थोरले महाराज यांचे पुण्यप्रभावे यातून पार होवू तो सुदिन.'' राजारामाच्या राज्यकारभाराबद्दल औरंगजेबाला कोणत्याही तऱ्हेचा संशय येऊ नये म्हणून येसूबाई राजारामास अनेक सूचना करते. राजाराम हा स्वत:ला शाहूचा प्रतिनिधी समजत असे. परंतु येसूबाई त्याला राजचिन्ह बाळगण्याची आज्ञा करते.

राजारामही येसूबाई व शाहू यांच्या सुटकेसंबंधी अतिशय उत्सुक आहे. रा.रा.यादवराव मुन्शी यांना केलेली आज्ञा व विनंतीपत्र यावरून त्याची खात्री पटते. शंकराजीपंतांच्या चौथाई व सरदेशमुखी परवाना व स्वराज्याची सनद यासंबंधी या पत्रात उल्लेख आहे. तसेच येसूबाई व शाहूविषयी प्रत्येक वेळी कळवीत जावे असाही उल्लेख या पत्रात आहे. य.रा.गुप्ते याजकडील पत्रावरून त्याची कल्पना येऊ शकते. (४३) महादजी घाडगे याला येसूबाईची भेट घेण्याबद्दल सरदेशमुखी दिल्यासंबंधीचा उल्लेख पेशवे दप्तरात आहे. (४४) कैदेत जाऊन बातमी काढून आणणे हे काम अतिशय जोखमीचे असल्याने राजारामाला त्याबद्दल सरदेशमुखी द्यावी लागत असावी.

येसूबाई व राजाराम यांच्याकडील अनेक जासूद निरनिराळ्या वेशांत एकमेकांबद्दलची माहिती आणीत होते. येसूबाईचेही सगळे लक्ष स्वराज्यात होते. राजारामाकडून येसूबाईचेही निरोप घेऊन गेलेल्या एका जासुदाच्या वाटखर्चाचा हिशोब पेशवे दप्तरात नमूद आहे.(४५)

शाहूही बादशहाला आपणाला राजारामाबद्दल प्रेम नाही किंवा त्याच्याबद्दल आपण आदर बाळगून नाही हे भासवीत होता. स्वराज्यातून यावेळी शाहूला सोडविण्यासाठी प्रयत्न चालू होते. मराठी प्रदेश संपूर्ण बादशहाच्या ताब्यात आलेला नव्हता. बादशहा स्वत:ही वृद्ध झाला होता. त्यामुळे त्याची मन:स्थिती दोलायमान होती. या सर्व धोक्यांचा विचार करून शाहूची राहण्याची जागा बादशहाच्या तंबूजवळ प्रथम करण्यात आली होती. त्यात बदल करण्यात आला. ''शाहू हा गुलालबहार (बादशहाचे निवासस्थान) मध्ये राहत होता. त्याला

शब्बाल महिन्याच्या २१ तारखेस (२५ जाने. १७०६) झुल्फिकारखानासोबत जाण्याची आज्ञा केली. यात काही राजकीय मसलत होती. शाहूचा तंबू झुल्फिकारखान्याच्या तळाजवळ लावण्याचा हुकूम झाला. शाहूला खास चिलतीची वस्त्रे व दोन मौल्यवान उदराजही (अलंकार) देण्यात आले.''(४६)

येसूबाईबरोबर कैदेत राजघराण्यातील अनेक लोक होते. औरंगजेबाने कितीही व्यवस्था ठेवली आहे, म्हटले आहे. तरी येसूबाईची आर्थिक परिस्थिती अत्यंत बिकट झाली होती. चिंचवडच्या मोरया देव यांना येसूबाईने कैदेत असता आपल्या आर्थिक हालाखीच्या स्थितीबद्दल पत्र पाठवले आहे. हे पत्र म्हणजे तिच्या साहित्यविषयक गुणांचा एक नमुनाच म्हणावा लागेल. संकटाचा परिहार व्हावा या हेतूने येसूबाईने चिंचवडकर देवांकडे पत्राद्वारे धाव घेतली आहे. (४७) येसूबाईने चिंचवडकर देवांकडे पाठविलेले पत्र-

॥ श्री शंकर ॥ १६२७ वै. शु. ७

राजश्री श्री देव स्वामीचे सेवेसी

॥श्रीमत् परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकल गुणालंकरण देवमान्य वरदमूर्तोपरायण राजमान्य राजश्री.

आज्ञाधारक सेवेसी ................. स्वामींनी आशिर्वाद पत्र पाठवून ............ आज्ञा केली की, अहमद नगरास जावे.............. बहुत तंगजाई जाली .............. कैलासवासी स्वामी गेल्या.......... इंगळास वोळंबे लागले ........... जाणिजे मो।

सेवेसी सेवक .......... हे विनंति.

या। छ ११ माहे मोहरम सन ४९ हे विज्ञापना.

**राजारामाची वतनासंबंधीची पत्रे :-**

शाहू केव्हा तरी स्वदेशी निश्चित परत येईल ही भावना राजारामाची होती. त्यामुळे तो स्वत:ला राज्याचा अधिकारी समजत नव्हता. शाहू मोगलांच्या कैदेत होता. या अनागोंदी कारभाराचा फायदा घेऊन अनेक संधिसाधू लोक नाना कट, कारस्थाने करीत होते. शिवाजी महाराजांच्या वेळी बंद करण्यात आलेली वतने राजारामाला पुन्हा सुरू करावी लागली. अनेक लोक अडचणीची संधी पाहून वतनाची मागणी करीत होते.

वतनासंबंधी दिलेल्या पत्रात राजारामाची शाहूसंबंधी काय भावना होती हे दिसून येते. ''चिरंजीव लोक करून तरी श्री देशी आणिल तेव्हा संकटी जी माणसे उपयोगी पडली त्यांच्या तसनिशी आम्ही करविल्या हे इकडे यावे त्या ............... यास स्वामीचेच कारणे ते मुख्य सर्व राज्यास अधिकारी, आम्ही करतो ते त्यांच्यासाठीच आहे.''(४८)

महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास यांत 'राजारामाची शाहूबद्दलची वृत्ती' या मथळ्याखाली दिलेल्या पत्रात म्हटले आहे. हे पत्र राजवाडे खंड १५ पृ. २९४ ले २८६ मध्ये दिले आहे.

रा. १६१९ भाद्रपद वद्य ४

इ.स. १६९७

श्री

राजमान्य राजेश्री शंकराजी नारायण पंडित यांसी आज्ञा ऐसिजे, राजश्री दादाजी नरसी प्रभु देश कुळकर्णी व गांव कुलकर्णी देहाये तर्फे रोहिडखोरे व वेलवंड खोरे यांचे वतन तुम्ही जप्त केले............... हे वतन परत देणे. मावळ मजकुरी स्वारी (शाहू) येण्याचे पूर्वी वतन दिल्यास मजकूर लिहीणे या उपरी वतन न दिल्यास हा बोभाटा आल्यास तुमचे अबरुस व पदास धक्का येईल असे स्वामीस भासत आहे. व पुढे नाना प्रकारच्या अडचणी तुम्हास अशा करणीच्या येतील कारण 'चिरंजीव कौल करुन तरी श्री देसी.'' आणतील तेव्हा संकटी जी माणसे उपयोगी पडली त्यांच्या तसनिशी आम्ही करविल्या. हे इकडे यावे त्याचे चित्ती द्वेश यावा व राज्यकर्त्यास इनसाफ पाहणे जरुर त्यात हे तरी. अविचाराचे कलम. भलाई झाली ती सारी आमची एकीकडे जाऊन असी करणी तुम्ही केली यास स्वामी द्रोहचेच करणे, ते मुख्य सर्व राज्यास अधिकारी. आम्ही करतो ते त्यांचेसाठीच आहे. प्रसंगास सर्व लोकांस तिकडेच पाहणे येईल व वागतील ते कारण इश्वरीच नेमले आहे. उगीच भरते भरी न भरणे. पुढे उर्जित होय ते करणे हे न केलिया केले कामाची फळे ज्याचे ते भरतील अशी श्री ची इच्छाच असली तरी तुम्ही तरी का समजाल, तरी नीट चालीने वागणे म्हणजे पुढे सर्वोपरी उर्जिताचेच करणे जाणजे निर्देश समक्ष मो‍ा असे तेरीख १७ सफर सु ।। समान

ति सैन. अलफ रुज सुनीस बारबार

बार सूद

वतनासंबंधी दिलेल्या पत्रात राजारामाची शाहूसंबंधी काय भावना होती हे दिसून येते. "चिरंजीव लोक करून तरी श्री देशी आणिल तेव्हा संकटी जी माणसे उपयोगी पडली त्यांच्या तसनिशी आम्ही करविल्या हे इकडे यावे त्या ............... यास स्वामीचेच कारणे ते मुख्य सर्व राज्यास अधिकारी, आम्ही करतो ते त्यांच्यासाठीच आहे."(४८)

महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास यांत 'राजारामाची शाहूबद्दलची वृत्ती' या मथळ्याखाली दिलेल्या पत्रात म्हटले आहे. हे पत्र राजवाडे खंड १५ पृ. २९४ ले २८६ मध्ये दिले आहे.

रा. १६१९ भाद्रपद वद्य ४

इ.स. १६९७

श्री

राजमान्य राजेश्री शंकराजी नारायण पंडित यांसी आज्ञा ऐसिजे, राजश्री दादाजी नरसी प्रभु देश कुळकर्णी व गांव कुलकर्णी देहाये तर्फे रोहिडखोरे व वेलवंड खोरे यांचे वतन तुम्ही जप्त केले............... हे वतन परत देणे. मावळ मजकुरी स्वारी (शाहू) येण्याचे पूर्वी वतन दिल्यास मजकूर लिहीणे या उपरी वतन न दिल्यास हा बोभाटा आल्यास तुमचे अबरुस व पदास धक्का येईल असे स्वामीस भासत आहे. व पुढे नाना प्रकारच्या अडचणी तुम्हास अशा करणीच्या येतील कारण 'चिरंजीव कौल करुन तरी श्री देसी." आणतील तेव्हा संकटी जी माणसे उपयोगी पडली त्यांच्या तसनिशी आम्ही करविल्या. हे इकडे यावे त्याचे चित्ती द्वेश यावा व राज्यकर्त्यास इनसाफ पाहणे जरुर त्यात हे तरी. अविचाराचे कलम. भलाई झाली ती सारी आमची एकीकडे जाऊन असी करणी तुम्ही केली यास स्वामी द्रोहचेच करणे, ते मुख्य सर्व राज्यास अधिकारी. आम्ही करतो ते त्यांचेसाठीच आहे. प्रसंगास सर्व लोकांस तिकडेच पाहणे येईल व वागतील ते कारण इश्वरीच नेमले आहे. उगीच भरते भरी न भरणे. पुढे उर्जित होय तें करणे हे न केलिया केले कामाची फळे ज्याचे ते भरतील अशी श्री ची इच्छाच असली तरी तुम्ही तरी का समजाल, तरी नीट चालीने वागणे म्हणजे पुढे सर्वोपरी उर्जिताचेच करणे जाणजे निर्देश समक्ष मो असे तेरीख १७ सफर सु ।। समान

ति सैन. अलफ — रुज सुनीस बारबार

बार सूद

(अस्सल पत्र सचिवपंतास दिले त्याची नकल ठेविली. त्याची नकल)

काही विशेष प्रसंगी राजारामाला अशी ताकीद द्यावी लागत असावी.

राजाराम जिंजीला असताना तेथून मोगलांचा वेढा पडला असता, मुक्तता करण्याकरता शिर्के यांनी मदत केली. गणोजी शिर्के मोगलांचे चाकर असता ताराबाई व राजसबाई, राजकुंवरसहित जंजीहून काढून अर्नास पाठविले. या सेवेबद्दल गणोजी शिर्के यांनी दाभोळची देशमुखी आपल्याला मिळावी म्हणून मागणी केली. खंडो बल्लाळने समाधान करून त्याकडे असलेले दाभोळचे देशमुखीचे वतन गणोजी शिर्केला दिले.(४९)

**शाहूची सुटका व मराठी राज्याचे तीन वारस-**

औरंगजेबाच्या आयुष्याची ८८ वर्षे पूर्ण झाली होती. गेली २६ वर्षे तो दक्षिणेत मराठ्यांच्या विरुद्ध झगडत होता. केवळ २९३ दिवसांच्या आजारामुळे २० फेब्रुवारी १७०७ ला औरंगजेबाचा मृत्यू झाला. त्याच्याबरोबर दक्षिणेत आलेल्या सरदारांची एक पिढी दक्षिणेत जन्माला आली. आता हे लोक उत्तरेकडे जायला उत्सुक होते.

मृत्यूपूर्वी औरंगजेबाने आणखी एक मुत्सद्दी डाव टाकून शाहूला नेस्तनाबूत करण्याचा प्रयत्न केला. ९ मे १७०३ ला हमिदुद्दीनला शाहूकडे पाठवून त्याने मुसलमान व्हावे म्हणून मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण शाहूने ही गोष्ट मान्य केली नाही.(५०)

कुठल्यातरी कारणावरून मराठ्यांशी तडजोड करण्याच्या प्रयत्नात शेवटी शेवटी औरंगजेब होता असे भीमसेन सक्सेना म्हणतात. ''बादशहाने मराठ्यांकडे पाठविलेली माणसे निराश होऊन फिरली. शाहूस गुलालबागेत परत नजरकैदेत ठेवण्यात आले. (५१) औरंगजेबाच्या मृत्यूनंतर शहा आलम उत्तरेकडे निघाला. ८ मे १७०७ ला शाहूला भोपाळ येथे सोडून दक्षिणेत जायला सांगण्यात आले. परंतु येसूबाई, मदनसिंग, दुर्गाबाई, जानकीबाई व सेवक लोकांना ओलीस म्हणून दिल्लीस नेण्यात आले. मुलाची सुटका झाल्याचा आनंद निर्भेळपणे उपभोगण्याचे भाग्य येसूबाईला लाभले नाही. तिची कैद अजूनही चालूच होती.







महाराणी येसूबाईंच्या समाधीचा परिसर : माहुली

**दक्षिणेतील मराठी राज्याची परिस्थिती-**

राजारामाच्या मृत्यूनंतर त्याची पत्नी ताराबाई हिने राजसत्ता आपल्या ताब्यात घेतली व मोगलांशी लढा पुढे चालूच ठेवला. औरंगजेबाने घेतलेले गड पुन्हा परत घ्यायला ताराबाईने सुरुवात केली. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर १७०७ नंतर मराठ्यांनी सिंहगड, पुरंदर, पन्हाळा, सातारा, परळी हे किल्ले १-२ महिन्यांच्या अवधीत परत घेतले. राजारामाच्या मृत्यूनंतर ताराबाईने आपला पुत्र दुसरा शिवाजी याला गादीवर बसवून स्वत: राज्यकारभार आपल्या ताब्यात घेतला. ती शाहूला मराठी राज्याचा वारस मानायला तयार नव्हती. तिने दोन मुद्द्यांवर शाहूचा अधिकार नाकारला. १) संभाजीच्या मृत्यूनंतर शिवाजी महाराजांनी निर्माण केलेले राज्य संपले. राजारामाने नवीन राज्य निर्माण केले. २) खुद्द शिवाजी महाराजांची इच्छा संभाजीऐवजी राजारामालाच स्वराज्याचे वारस नेमण्याची होती. अर्थात हे मुद्दे परस्पर विसंगत होते. त्यामुळे टिकणारे नव्हते.(५२)

यावेळेला शाहूची सुटका केल्यास मराठी राज्यात वारसासाठी भांडणे सुरू होतील, हा सूज्ञ विचार करून शाह आलमने शाहूची सुटका केली. राजारामाची दुसरी पत्नी राजसबाई हिने कोल्हापूरवर वर्चस्व स्थापून आपला मुलगा दुसरा संभाजी याला गादीवर बसवून सत्ता आपल्या हातात घेतली.

आता मराठी राज्याचे तीन वारस झालेले दिसतात. राजारामाचा ताराबाईपासून झालेला शिवाजी (दुसरा), राजसबाईचा संभाजी (दुसरा) व येसूबाईचा शाहू. येसूबाई मात्र यावेळी महाराष्ट्रापासून हजारो मैल दूर होती.

कैदेत का होईना परंतु आतापर्यंत येसूबाई मराठी राज्यात होती. आता मात्र दिल्ली सारख्या परकीय राज्यात तिला पुढील काळ घालवावयाचा आहे. तिच्या आयुष्यातील राज्यरक्षणाकरता केलेल्या प्रयत्नांना कितपत यश आले हा भाग वेगळा. परंतु शिवाजी महाराजांच्या वेळेपासून ते संभाजीच्या मृत्यूनंतरपर्यंतच्या घटना, त्यातील येसूबाईचा सहभाग, तिच्या आयुष्यातील अनेक चढउतार यांचे एक महत्त्वाचे पर्व इथे संपले.

**येसूबाईवरील गंभीर आरोप-**

इ.स. १९१६ च्या जुलै महिन्याच्या रिव्ह्यूत येसूबाई संबंधाने प्रा. जदुनाथ

सरकार यांनी काही गैरसमज निर्माण केलेले दिसतात. "संभाजीच्या वधानंतर येसूबाई हिच्यावर मोठा खेदजनक परिणाम झाला. एका किल्ल्यात तिला कैद करून ठेवले असता एका मुसलमान किल्लेदाराने तिजवर बलात्कार केला. हा प्रकार गुप्त ठेवण्यास निसर्गाने अशक्य झाले तेव्हा बादशहास ही गोष्ट कळली. त्याने त्या उच्छृंखल किल्लेदारास शासन केले." (५३)

सन १९१६ च्या जुलै महिन्याच्या 'मॉडर्न रिव्ह्यू'त शिवछत्रपतीची सून व संभाजीची बायको येसूबाई हिच्या संबंधाने प्रो. जदुनाथ सरकार यांनी खालील मजकूर प्रसिद्ध केला होता.

"संभाजीच्या वधानंतर ...................... तिजवर बलात्कार ............... किल्लेदारास शासन केले."

हा नालस्तीचा मजकूर वाचून ................ तिच्या सद्वर्तनासंबंधाने धन्योद्गार ऐकू येतात............... मराठीतील बखरी व कागदपत्र पाहता................. प्रसंग गुजरल्याचे दिसत नाही. .............. येसूबाईस त्याने दक्षिणेस येऊ दिले नाही.............. शाहूची बायको सावित्रीबाई दिल्ली येथे कैदेत वारली................. पुढे येसूबाई मरण पावल्याची खबर........... संभाजीने शाहूला लिहिलेले सांत्वनपत्र ............ संभाजी व येसूबाई यांचे लग्न इ.स. १६६९ च्या सुमारास झाले .............. मातुश्रींवर भलताच प्रसंग गुदरल्याची कल्पना शाहूस नव्हती. ............. मराठे लोक अब्रूसाठी प्रत्यक्ष जिवाचाही त्याग करीत ............. कोण्यातरी घमेंडखोर मुसलमानाने मराठ्यांना चिडविण्याकरता काहीतरी केलेले आहे............ दोनशे वर्षांनंतर भलतीच नालस्ती करू नये.

प्रो. सरकार यांनी ................... मराठी वाचकांकरता येथे प्रसिद्ध केला आहे.

या निर्माण केलेल्या वादळामुळे येसूबाईच्या सद्वर्तनाबद्दल शंका निर्माण झाली. मराठी कागदपत्र पाहता अशा तऱ्हेची कोणतीही घटना झालेली आढळून येत नाही. इ.स. १६९० मध्ये औरंगजेबाच्या कैदेत असल्यापासून इ.स. १७१८ मध्ये दक्षिणेत येईपर्यंत तिचे वर्तन अतिशय मुत्सद्देगिरीपणाचे व चतुराईचे व अत्यंत सौजन्यपूर्ण असे आढळून येते. १६९० ला कैद झाली त्यावेळी तिचे वय

३० वर्षांचे असावे. तिच्याबरोबर १० वर्षांचा पुत्र शाहू व इतर मंडळी सोबत होती. अशा परिस्थितीत बलात्कार होणे संभवनीय नाही. त्यावेळेची जातिबंधनेही शिथिल नव्हती. ही गोष्ट घडली असती तर कदाचित शाहूने तिच्या सुटकेसंबंधी प्रयत्नही केले नसते. एवढेच काय पण स्वत: येसूबाईही या प्रकारानंतर जिवंत राहणे शक्य नाही. शाहूला मातोश्रींबद्दल केवळ पूज्यबुद्धी होती याबद्दलचा उल्लेख शाहू बखरीत आहे. (५४)

मराठ्यांच्या चालीरीतींना व मानसन्मानाला कैदेत असतानाही जपणाऱ्या येसूबाईवर मोगलांकडे असताना बलात्कार झाला हा वृथा आरोप खोटा होता हे नंतरच्या सर्वच इतिहासकारांनी मान्य केले आहे.

**येसूबाईचे दक्षिणेत आगमन-**

एखाद्या व्यक्तीच्या प्रत्येक कृतीबद्दल मतमतांतरे असणे हे जणू ठरलेले असते. येसूबाईच्या आयुष्यातील घटनांबद्दल असेच अनेक प्रवाद आहेत. शाहूची सुटका झाली. परंतु येसूबाईला मात्र ओलीस म्हणून दिल्लीला नेण्यात आले. आतापर्यंत कैदेत निदान पुत्र जवळ होता. आता पुत्र स्वत:चे राज्य परत घेईल. परंतु माता त्याचे कौतुक करण्याकरता जवळ असणार नाही.

शाहूने येसूबाईच्या सुटकेकरता अनेकांना लिहिले. यादवराव मुन्शी यांस इ.स. १७१८ त लिहिलेल्या पत्रात येसूबाईच्या दिल्लीहून दक्षिणेत आगमनाची अपेक्षा शाहूने केली आहे.(५५)

हुसेन अली मार्फत शाहू व बादशहा यांच्यात जो तह ठरला त्यातील ६ वे कलम, त्यात शाहूची मातोश्री व कुटुंब व संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग वगैरे दिल्लीस बादशहाचे कबजात आहेत. त्यास सोडून स्वदेशी पावते करावे १७१८ असा उल्लेख आहे.(५६)

"सय्यद हुसेनच्या मदतीने शाहू महराज व बादशहाच्यात इ.स. १७१८ मध्ये पुढीलप्रमाणे करार झाला. हा चौथाईचा करार म्हणून ओळखला जातो. राजवाडे लेखसंग्रह भाग १ ला. ऐतिहासिक प्रस्तावना प्रका. शं.न. जोशी पृष्ठ ३४ वर सविस्तर वृत्त आले आहे. १) शिवाजीच्या वेळेचे स्वराज्य तमाम गडकोटासुद्धा शाहूच्या हवाली करावे. २) अलीकडे मराठे सरदारांनी जिंकलेले

प्रदेश म्हणजे खानदेश, गौडवन, वऱ्हाड, हैद्राबाद, कर्नाटक या भागातले यादीत नमूद केल्याप्रमाणे मोगलांनी सोडून देऊन ते मराठ्यांच्या स्वराज्यात सामील करावे. ३) मोगलांच्या दक्षिणेकडील मुलखावर चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मराठ्यांनी वसूल करावे. या चौथाईच्या बदल्यात आपली पंधरा हजार फौज मराठ्यांनी बादशहाच्या मदतीस ठेवावी आणि सरदेशमुखीचे बदल्यात मोगलांचे मुलखात मराठ्यांनी चोऱ्या वगैरेचा बंदोबस्त करावा. ४) कोल्हापूरच्या संभाजीस, शाहूने उपद्रव करू नये. ५) मराठ्यांनी दरसाल बादशहाला दहा लाख खंडणी द्यावी. आणि शाहूची मातोश्री, कुटुंब, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग देखील कबीले दुर्गाबाई सेवकलोक सोडून स्वदेशी पावते करावे.'' मातोश्री येसूबाईच्या सुटकेसंबंधीचे हे कलम अतिशय भावपूर्ण वाटणारे आहे.

या तहाची अंमलबजावणी करून घेण्याकरता बाळाजी विश्वनाथ दिल्लीकडे गेले. दिल्लीला पोचण्यापूर्वीच बाळाजीस तह पूर्ण करून रस्त्यातच मिळाला. परंतु येसूबाई व मंडळी यांना ताब्यात घेण्याकरता बाळाजीला दिल्लीला जावे लागले. बाळाजी बरोबर येसूबाई, मदनसिंग व सर्व मंडळी इ.स. १७१९ च्या जुलैला परत आली. येसूबाईचे सातारला आगमन झाल्याबद्दल शाहूला अतिशय आनंद झाला. स्वतःच्या मातोश्रींबद्दल शाहूला केवढी पूज्यबुद्धी होती याबद्दल शाहूच्या बखरीत अनेक स्पष्ट उल्लेख आहेत.(५८)

मराठ्यांच्या इतिहासाबद्दल अत्यंत कसोशीने लिहिणारा एर्व्हिन ''मुले माणसे बाळाजीच्या स्वाधीन करण्यात आली.'' असे स्पष्ट सांगतो. (५९) महाराष्ट्राच्या बाहेरील लेखकांकडून येसूबाई दक्षिणेत आली याबद्दल काय पुरावे आहेत अशी विचारणा करण्यात येते.

त्यांना ग्रँट डफ (पृ. ३६८-३९१) एर्व्हिन व शाहू महाराजांचे चरित्रकर्ते मल्हार रामराव चिटणीस (पृ ३८-३९) यांची याबाबतची एकवाक्यता आहे; हे सांगितल्यास खात्री पटेल. तसेच बोरगावकर दप्तरात येसूबाईने दक्षिणेत आल्यानंतर दिलेल्या वर्षासनाचा उल्लेखही आहे. (६०) येसूबाई दक्षिणेत आली नसती तर हे वर्षासन दिले गेले नसते. तसेच य.रा. गुप्ते यांच्या संग्रही असलेल्या शाहूला लिहिलेल्या संभाजीच्या पत्रावरूनही येसूबाई दक्षिणेत आली होती हे सिद्ध होते. या पत्रात ''मातोश्री आऊसाहेब आली हे वर्तमान

लिहावयासी आवकाशावरी पडते. त्याचे कारण लिहिले ते ही अवगत झाले.'' (६१) असे लिहिलेले आहे. हे पत्र येसूबाईच्या दक्षिणेतील आगमनाबद्दल निश्चित सांगते.

**दक्षिणेत आगमन-**

''माहाराजांची मातोश्री दिल्लीहून देसी आली शके १६४०.'' (६२) याची कारकिर्दी यांत येसूबाई दक्षिणेत आल्यासंबंधीचा उल्लेख आहे. या सर्व माहितीवरून येसूबाई दक्षिणेत आली हे मान्य करावेच लागते. मात्र कुठल्या मार्गाने याचा विचार करावा लागेल. येसूबाई व मदनसिंग व कबिले यांच्या वाटखर्चाचा कागदही मिळाला आहे. ''तेरीज जमाई माहे सफर महाल पोते स्वाही राजश्री पंतप्रधान सु।। तिसा अशर मया अलफ (१६ फेब्रु. १७१९) मधील काही नोंदी अशा आहेत.

माहे शाखर.
तेरीख १९ रोज फालगुण माहुल.
शस्टी मंद वासर (२८ फेब्रु १७१९)
मु।। इंद्रप्रहस्त
येमुना दखणतीर

.........................

राजश्री मदनसिंग रुपये
१५० मातु श्री येसुबाई
रुपये.''

नंतर इंद्रप्रस्थाहून निघाल्यावर प्रवासात जे मुक्काम व ते ज्या तारखेस त्याचे आकडे हिजरी व इंग्रजी असे दिलेले आहेत. मोगलसराई भेलसा, सिदूर, नेमाड, ............ तापी खीर.(६३)

या राबिलाखेर महिन्याच्या खर्चाच्या टिपणावरून येसूबाई व इतर मंडळी ९ मे १७१९ ला तीरावरती येऊन पोचली होती हे स्पष्ट होते. नंतर स्वराज्यात आल्यानंतर येसूबाई व कुटुंबीय पुढे साताऱ्यास आलीं असावीत. शाहूने दक्षिणेत इ.स. १७०८ मध्ये छत्रपतीचे सिंहासन ताब्यात घेतले. परंतु येसूबाईला दिल्लीहून

स्वराज्यात आणण्याकरता पुढील १० वर्षे त्याला प्रयत्न करावा लागला. दिल्लीच्या तख्ताच्या ठायी आपली निष्ठा अनेक प्रकाराने शाहूला सिद्ध करावी लागली व त्यांत शाहूला यश आल्यामुळेच जवळ जवळ १०-१२ वर्षांनंतर येसूबाईला आपल्या छत्रपती मुलाचे दर्शन घडले.

**येसूबाईचे स्वराज्यात आगमनानंतरचे कार्य-**

दिल्लीहून स्वराज्यात परत आल्यानंतरचा काळ आपल्या मुलासह येसूबाईने मोठ्या आनंदाने घालविला. तिच्या आयुष्यातील बोटावर मोजण्यासारखे जे सुरुवातीचे क्षण आहेत त्यात या काळाची गणना करता येईल.

यावेळी येसूबाईचे वय ६० वर्षांचे झाले होते. परंतु या वयातही तिने शाहूच्या कारकिर्दीत काही राजकीय व न्यायनिवाड्याची कामे केलेली दिसतात. पेशवे दप्तरातील खालील मजकुर येसूबाईने वे. भू. ''रंघनाथभट बिन शंकरभट सावलीकर वास्तव्य कसबे कऱ्हाड ............... यांना (हिंदुस्थानातील) पृथ्वी प्रदक्षिणा करून आलेनंतर मातोश्री आऊसाहेबी (मु. येसूबाईने) वर्षासन पत्र दिले आहे. होन छ २५ रबिलावल सु॥ अज्ञरीन मया व अलफ (६४) (सुमारे ता. ४ जाने. १७२०) यांना हे वर्षासन दिल्याचा उल्लेख आहे.

यानंतर वडिलकीच्या नात्याने येसूबाईने सरकारकुनांच्या कुटुंबातील तंटेही मिटविलेले दिसतात. १ मे १७१९ च्या वाटणीपत्रात मजकूर असा आहे. ''यादी वाचली राजश्री नारोशंकर व महादजी शंकर गौडकर सुदूर सन तिचा अक्षर मया अलफ कैलासवासी शंकराजी नारायण यानी महादजी पंत दत्तपुत्र घेतले. पुढे औरसपुत्र नारोपंत जाले. या उभयतांमध्ये कथला पडू लागला. सबब मातुश्री येसूबाई याणी चौघांस बोलावून उभयतांची समजूत करावी......... त्यावरून उभयतांनी चालावयाची कलमे ............ चजीजवस्तु सुधा निमे निमे निमे .......... घ्यावी शामजी इशी सुभेदार याणी मातोश्री येसुबाई यास शफतपुर्वक पुसून वाटणी करावी............ उभयतांनी एकविचारे चालून मातोश्रींच्या आज्ञेत राहून लौकीक राखावा............... एकूण कलम सात............(६५)

येसूबाई सुविद्य, सुसंस्कृत असल्याने संभाजीच्या कारकीर्दीपासून ते शाहूच्या कारकीर्दीपर्यंत राजकीय, सामाजिक, धार्मिक सगळ्या प्रकारचे निर्णय योग्य तऱ्हेने देत होती. परंतु तिची दाद - फिर्याद मुक्तकंठाने आजपर्यंत इतिहासात घेतलेली दिसत नाही.

**येसूबाईची अखेर -**

येसूबाईच्या मृत्यूसंबंधीही निश्चित तारीख सांगता येत नाही. तिच्या मृत्यूनंतर शाहूने ही बातमी कोल्हापूरच्या संभाजीला कळविली. त्यावर संभाजीला शाहूचे आलेले सांत्वनपर पत्र प्रसिद्ध आहे. त्यावरून येसूबाईचा मृत्यू १७३१ नंतर झाला असावा. (६६) कारण १७३१ पर्यंत शाहू व संभाजी यांच्यात वितुष्ट होते. याच साली उभयतांचा वारणा येथे तह झाला. तेव्हापासून दोघांमध्ये प्रेमभाव असल्याचे दिसते. यावरून हे सांत्वनपर पत्र १७३१ नंतरच पाठविलेले असावे. यावर तारीख नसल्याने येसूबाईच्या मृत्यूची नोंदही वादग्रस्त आहे. वा.सी. बेंद्रे हे येसूबाईच्या मृत्यूचा काळ इ.स. १७१९ किंवा १७२० मधील असावा असे सांगतात. (६७) परंतु संभाजीच्या पत्रातील उल्लेख हा जास्त सयुक्तिक वाटतो.

येसूबाईच्या मृत्यूनंतर तिचा दहनविधी संगम माहुली येथे करण्यात आला. माहुली संगमावर राणी येसूबाईचे वृंदावन अंगर मेघडंबरी बांधल्यानंतर शाहू महाराज येथील दर्शनास जात व वृंदावनाच्या पूजाव्यवस्थेसाठी जे लोक ठेविले होते ते तेथे राहतात. (६८) आणि बेंद्रे यांनी सांगितल्याप्रमाणे समाधीच्या चौथऱ्यावर वाळूचे थर आहेत. ती वाळू बाजूला करून पाहिल्यानंतर तिथे त्या चौथऱ्यावर एक शिवलिंग व दोन पायाचे ठसे एवढेच दिसते. संशोधक सुरेश जोशी यांनी कै. बेंद्रे यांनी सांगितलेली समाधीची जागा ती नसून ताराबाईच्या पुरंदरे दप्तरातील २ ऑगस्ट १७३० च्या पत्रावरून वृंदावनाचे स्थान हे संगम माहुली गावात शिरताना उजव्या हाताला सुगुमेश्वराच्याच वर असावे असे पुणे सकाळ मार्च ३०,१९९१ मध्ये प्रसिद्ध केलेल्या लेखात म्हटले आहे. परंतु अजूनही संशोधकांकडून त्याला संमती मिळालेली नाही.

येसूबाईच्या समाधी स्थानाबद्दलचे वाद अजूनही चालूच आहेत. या वादग्रस्त राणीबद्दल अजूनही पुराव्याचा अभावच आहे.



# संदर्भ

१. Karandikar S.L., The Rise and Fall of Maratha Power P.256
२. परमानंद काव्य
३. उपरोक्त
४. उपरोक्त
५. चिटणीस बखर - संभाजी महाराज व शाहू महाराज चरित्रे, पृ. ७
६. उपरोक्त पृ. ८
७. सरदेसाई गो.स., उग्रप्रकृती संभाजी पृ. १०५.
८. शिवचरित्र साहित्य, खंड ९
९. बेंद्रे, वा.सी. छत्रपती संभाजी महाराज, पृ. ५१२
१०. चिटणीस बखर, भीमराव कुळकर्णी (संपा) पृ. ८
११. सरदेसाई गो.स. पृ. १०६
१२. कुरुंदकर, मागोवा पृ. ९७
१३. मागोवा पृ. ९९
१४.(अ.) श्री समर्थ रामदासांची कागदपत्रे, परिशिष्ट, क्र. १
१४. (ब.) जोशी, शं.ना. (संपा.) संभाजीकालीन पत्र सार संग्रह पृ. ९५ परिशिष्ट पत्र, पे.द. ३१ ते ४६.
१५. राजवाडे खंड २०
१६. पेशवे दप्तर, पूर्ण जमाव वढु "बुं" रुमाल क्र. १११३
१७. शाहू दप्तर, रुमाल ११, पे.द.
१८. शाहू रोजनिशी, ८८ पृ. ३६ शाहू दप्तर माल क्र. १ पुडके क्र. १४-४४, पे.द.
१९. भारत वर्ष मासिक
छत्रपती संभाजीचे पश्चात मराठ्यांची स्थिती, पृ. ९
२०. करंदीकर एस्. एल. पृ. ११३
२१. Grant Duff, A History of Marathas, J/C 1921
२२. जेधे शकावली
२३. गोगटे, चि.गं. छत्रपती थोरले शाहू महाराज यांचे चरित्र पृ. १५
२४. M.I.A. Ch.B.3, P.199

औरंगजेब नामा, खंड १२, पृ. ७१
२५. गोगटे चि.गं. छत्रपती थोरले शाहू महाराज चरित्र. पृ. १६
२६. चिटणीस बखर, थोरले राजाराम चरित्र, पृ. २०-२१
२७. उपरोक्त
२८. जेधे शकावली.
२९. जेधे शकावली पृ. १६
३०. चौबळ, ज.स. (अनुवादक), असे होते मोगल.
३१. चिटणीस बखर.
३२. भारत वर्ष मासिक पृ. २८
३३. गुप्ते, बा.आ. (संपा) चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंच्या इतिहासाची साधने, वर्ष १ ले, अं. १ ला.
३४. ऐतिहासिक चर्चा, भारत वर्ष, खंड ३ रा.
३५. राजवाडे, वि.का. मराठ्यांच्या इतिहासाची साधने खं. २२ (पेशव्यांची शकावली)
३६. गोगटे चि.गं.
३७. पगडी सेतु माधवराव, मराठ्यांची स्वातंत्र्य युद्धे, पृ. ३८९
३८. उपरोक्त पृ. ३९५
३९. पगडी सेतु माधवराव, मराठे व औरंगजेब पृ. ४६
४०. उपरोक्त पृ. ४७६
४१. उपरोक्त पृ. ४८३
४२. कुळकर्णी भीमराव (संपा) चिटणीस बखर पृ. ३३
४३. सरदेसाई गो.स. मराठी रियासत, भाग १ ला पृ. १०३-१०४.
४४. पेशवे दप्तर, क्र. फडके कृ. १५
४५. उपरोक्त क्र. १३ फडके क्र. ८
४६. पगडी सेतु माधवराव, मराठे व औरंगजेब, पृ. १३६
४७. महाराष्ट्र इतिहास मंजिरी
आपटे द.वि., निवडक ऐतिहासिक उतारे पूर्वार्ध, पृ. १३३
४८. राजवाडे खं. १५ महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास, ले. २८६, पृ. २९४.

४९. राजवाडे, शिवचरित्र साहित्य, खंड ३, ले ४३८.
५०. पगडी सेतु माधवराव, हिंदी स्वराज्य व मोगल, पृ. २६५-६६
५१. उपरोक्त पृ. २६५-६६.
५२. कुलकर्णी अ.रा. (संपा) खरे ग.ह. मराठ्यांचा इतिहास पृ. ४५०
५३. सरदेसाई गो.स., ''येसुबाई'' नवयुग, ४ मे १९१७, पृ. ५६९-७१
५४. शाहू महाराजांची बखर, पृ. ३८-४२
५५. सरदेसाई गो.स. मराठी रियासत (मध्यविभाग) पृ. १०३
५६. सरदेसाई, कुलकर्णी या.मारकाळे ऐतिहासिक पत्र व्यवहार १७१८.
५७. सरदेसाई गो.स., मराठी रियासत (मध्य विभाग)
५८. छत्रपती शाहूची बखर, द्वि.आ., पृ. ३८-४२.
५९. ग्रँट डफ, उपरोक्त पृ. ३३८-३९१
६०. विविध ज्ञान विस्तार ऐतिहासिक चर्चा. पृ. ३४७
६१. सरदेसाई गो.ल., (मध्यविभाग), मराठी रियासत, खंड १ला पृ. ११८
६२. राजवाडे वि.का. उपरोक्त खंड १५ वा, ले ३०१ पृ. ३१४
६३. बेंद्रे वा.सी. छत्रपती संभाजी महाराज पृ. ५२०-२१
६४. इ.स. पे.द. मा., पृ. २५७
सरदेसाई गो.स., मराठी रियासत (मध्यविभाग) पृ. ११७.
६५. राजवाडे, खंड १५, ले २९८, पृ. ३०९-११
६६. सरदेसाई गो.स., उपरोक्त, पृ. ११६
६७. बेंद्रे वा.सि. उपरोक्त पृ. ५२१
६८. उपरोक्त

: ६ :

# येसूबाईच्या कार्याचे मूल्यमापन

मराठ्यांच्या इतिहासातील महाराणी येसूबाईचे स्थान निश्चित करताना आपणाला तिच्या कार्याचे मूल्यमापन करणे आवश्यक ठरते. तिच्या कार्याचा आढावा घेताना अभ्यासाच्या दृष्टिकोणातून तिच्या कार्याची खालील तीन भागांत विभागणी करावी लागते.

१. शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीपासून त्यांच्या मृत्यूपर्यंत.

२. संभाजीच्या राज्यारोहणापासून त्याच्या मृत्यूपर्यंत.

३. संभाजीच्या वधापासून शाहूच्या कारकिर्दीपर्यंत.

## १. शिवाजी महाराजांची कारकीर्द व येसूबाई (इ.स. १६६५ ते १६८०)

१६६५ ते १६८० या कालखंडात येसूबाईच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास क्रमशः होत गेला. शिवाजीचे राजकारण, संभाजी व शिवाजी या पितापुत्रांचे संबंध, वडिलधाऱ्या स्त्रियांचा याकडे बघण्याचा दृष्टिकोण या सर्वांच्या अनुषंगाने येसूबाईला स्वतःचे स्थान निश्चित करावयाचे होते. या कालखंडातील सुखद बाब म्हणजे येसूबाई आणि शिवाजी यांचा परस्परांबद्दल असलेला विश्वास. वास्तविक या कालखंडात श्वशुर व स्नुषा-तेही राजकारणासारख्या स्त्रियांच्या दृष्टिकोणातून त्याज्य अशा विषयांसंबंधी काही बोलणे किंवा ते मनात आणणे हे जेव्हा अशक्यप्राय होते, अशा परिस्थितीत येसूबाईने शिवाजी महाराजांशी जवळीक सांगणे हे एक तिच्या अंगभूत गुणांचे श्रेष्ठत्व मानावयास पाहिजे. म्हणून आपल्याला शिवाजी महाराजांच्या कालखंडातील येसूबाईच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास म्हणजे तिच्या प्रशिक्षणाचा कालखंड म्हणून मानावा लागतो. येसूबाई व शिवाजी महाराज यांच्या संबंधावर प्रत्यक्ष प्रकाश टाकणारे प्रत्यक्ष पुरावे अपवादात्मकच मिळत असल्यामुळे खालील चर्चेचा भाग अनुमानावर आधारीत आहे हे विचारात घेणे आवश्यक आहे.

शिवाजी महाराजांनी स्वराज्य स्थापनेच्या कार्याचा आरंभ केल्यानंतर पिलाजी शिर्के यांच्यासारख्या लोकांशी सोयरिकीचे संबंध प्रस्थापित केले. यामुळेच पिलाजी शिर्के यांची कन्या जिऊबाई (येसूबाई) ही सून म्हणून भोसले घराण्यात आली. इ.स. १६६५ च्या सुमाराला ५-६ वर्षांच्या आसपास असलेली येसूबाई आणि तिच्यापेक्षा थोडाच मोठा - ८-९ वर्षांचा असलेला संभाजी साधारण बरोबरीचेच होते. येसूबाईबरोबर शिर्के यांच्याकडील केशवभट व रघुनाथ पंडित हे दोन विद्वान शिवाजी महाराजांकडे आले.

रघुनाथ पंडितावर महाराजांनी न्यायदानाची जबाबदारी सोपविली व केशवभटाची नेमणूक संभाजीचा शिक्षक म्हणून करण्यात आली. संभाजी व येसूबाई हे दोघेही केशवभटाकडे शिकत असावेत. कारण राज्यकारभारातील तिचे शहाणपण व सुविज्ञता पाहिली म्हणजे हे अनुमान मान्य करायला काहीच प्रत्यवाय नसावा असे वाटते. जिजा मातोश्रींच्या प्रेमळ छत्राखाली संभाजी व येसूबाई वाढत होते. जिजाबाईंचे संभाजीबद्दलचे विशेष प्रेम आणि त्यामधून घडत जाणाऱ्या संभाजीच्या स्वभावाचे निरीक्षण ती करीत होती. तसेच शिवाजी महाराजांच्या स्वराज्याच्या कल्पना, त्यांचे स्वराज्यावरील आत्यंतिक प्रेम व त्यासाठी त्यांनी सोसलेले कष्ट हेही येसूबाई समंजसपणाने आत्मसात करीत होती. त्यामुळे शिवाजी महाराजांचे राजकारण, त्यातील बारकावे, महाराजांनी वेळोवेळी घेतलेले निर्णय, या सगळ्यांचा परिणाम म्हणजे स्वराज्याच्या रक्षणाकरिता तिने घेतलेले निर्णय. शिवाजी महाराजांच्या राजनीतीचे प्रतिबिंब त्यात पडलेले दिसते. यावरून येसूबाईच्या जडण - घडणीवर जिजाबाईप्रमाणेच शिवाजी महाराजांचाही प्रभाव पडलेला दिसून येतो.

शिवाजी महाराजांनाही संभाजीपेक्षा येसूबाईचाच विश्वास जास्त वाटत असावा. अशाही घटना घडलेल्या आहेत. त्यामुळे या अनुमानाला बळकटी येते. जिजाबाईंच्या मृत्यूनंतर अष्टप्रधान मंडळ व शिवाजी महाराज यांच्याशी संभाजीचे संबंध दुराव्याचे होत गेले. तेव्हा जिजाबाईचे प्रेम तर संभाजीला द्यायचे. परंतु या निर्माण झालेल्या संघर्षातून मार्ग कसा काढायचा याचा विचार संभाजी किंवा इतर कुटुंबीयांपेक्षा येसूबाईच जास्त समंजसपणाने करू शकेल याची खात्री महाराजांना असावी म्हणूनच कर्नाटकच्या स्वारीवर जाताना संभाजीवर शृंगारपूर

जवळील प्रभावळीचा कारभार पाहण्याचे काम महाराजांनी सोपविले. कारण शृंगारपूर येसूबाईचेच माहेर आणि वडीलधारे पिलाजी शिर्के त्यावेळी हयात होते. तेव्हा येसूबाईसह संभाजीला तेथे ठेवण्याच्या महाराजांच्या धूर्त हेतूची कल्पना येऊ शकते. संभाजीच्या व पर्यायाने शिवाजी महाराज व येसूबाई यांच्या आयुष्यातील सर्वांत दुर्दैवी घटना म्हणजे संभाजीने मोगलांना जाऊन मिळणे होय. कदाचित या घटनेची पूर्वकल्पना असूनही येसूबाईचा विरोध तोकडा पडला असेल. संभाजी मोगलांकडून परत आल्यावर त्याला पन्हाळ्याच्या नजरकैदेत ठेवण्यात आले. त्यावेळी त्याच्याबरोबर येसूबाईलाही महाराजांनी ठेवले होते. यावेळी रायगडावर राजारामाचा लग्नसोहळा असताना, पन्हाळ्याच्या आसपास मोगलांच्या वाढत्या हालचाली सुरू असताना येसूबाईला तिथे ठेवणे धोक्याचे असूनही महाराजांनी ज्याअर्थी तिला तेथे राहायला सांगितले, त्यावरून तिच्यावर महाराजांचा विश्वास होता असे अनुमान काढायला हरकत नाही.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर येसूबाईने जे अनेक निर्णय स्वत:च्या चाणाक्षपणाने घेतले ते सगळे महाराजांच्या संपूर्ण कारकिर्दीच्या केलेल्या निरीक्षणावरच आधारीत होते. महाराजांच्या विश्वासाला आपल्या कर्तृत्वाने येसूबाई नक्कीच पात्र ठरली हे यावरून दिसून येते.

## २. संभाजीच्या राज्यारोहणापासून त्याच्या मृत्यूपर्यंत-

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर इ.स. १६८० ते १६८९ हा काळ मराठी राज्याचा कसोटीचा काळ होता. या नऊ वर्षांच्या घटना काळात येसूबाईचे योगदान अतिशय महत्त्वाचे होते. प्रत्यक्ष इतिहासात तिच्या कार्याची स्पष्ट नोंद नसली तरी संपूर्ण मराठी राज्यावर त्याचे परिणाम झालेले आढळून येतात.

संभाजी आणि येसूबाई हे जेव्हा स्वराज्याची सत्तासूत्रे हाती घेतात तेव्हा एकप्रकारची युद्धक्रांती झालेली आढळते. संभाजीच्या वारसदारीवरून मराठ्यांच्या अष्टप्रधानामध्ये दोन तट निर्माण झाले होते. त्यामुळे विरोधकांविरुद्ध संभाजीने कडक धोरण स्वीकारले असल्यास आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. तथापि त्यामुळे राज्य चालवणे अवघड झालेले दिसते. म्हणजेच येसूबाईला एकावेळी दोन आघाड्यांवर लढा द्यावा लागला.

१) संभाजीला शांत करून त्याला राज्यकारभाराच्या जबाबदारीची जाणीव उमजेल अशा पद्धतीने देणे.

२) विरोधकांची सहानुभूती प्राप्त करून घेऊन त्यांना राज्यरक्षणाकरता उद्युक्त करणे. हा सगळा नऊ वर्षांचा कालखंड अतिशय महत्त्वाचा होता. मोगलांच्या विध्वंसक आक्रमणाला पायबंद घालणे आवश्यक होते. या दुसऱ्या कालखंडातच तिच्या व्यक्तिमत्त्वाचे उदात्त दर्शन घडत असले तरी तिला म्हणावे तेवढे स्वातंत्र्य नसल्यामुळे अनेक आघाड्यांवर तिला माघार घ्यावी लागली. आपल्या कर्तृत्वाने तिने संभाजीचा विश्वास संपादन केला असला तरी स्वत:चे सार्वभौमत्व तो कधीच विसरू शकत नव्हता. त्यामुळे संभाव्य संकटाची चाहूल लागलेली असतानाही येसूबाईला संभाजीविरुद्ध मनाजोगी उपाय - योजना करता आली नाही. त्यामुळे दुसऱ्या कालखंडात ज्या प्रमाणात तिच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होत गेला तशीच संकटेही चढत्या क्रमाने येत गेलेली दिसतात.

इ.स. १६८० नंतर औरंगजेबासारखा प्रबळ शत्रू स्वत: सर्व शक्तीनिशी दक्षिणेत आला. राजप्रतिनिधींच्या विरोधाची धार कमी करून येसूबाईने आपल्या माहेरच्या मंडळींना तसेच सोयराबाई, राजाराम, खंडो बल्लाळ यांना संरक्षण दिले. संभाजीच्या क्रोधामुळे निर्माण होऊ पाहणाऱ्या अनेक दुर्घटना तिने समंजसपणे टाळल्या. शिवाजी महाराजांच्या वेळी अधिकारावर असलेल्या अनुभवी लोकांची पुन्हा त्याच अधिकारावर नेमणूक केली. बाळाजी आवजी सारख्या निरपराध माणसाला केवळ संशयाने मारल्याबद्दल संभाजीला तिने दिलेल्या कानपिचक्या इतिहासात नमूद आहेत. चिटणीस बखरीत त्याचे मोठे मार्मिक वर्णन केलेले आहे. खंडो व निळो बल्लाळ या मंडळींचा सांभाळ येसूबाईने केला.

राजारामाच्या पहिल्या विवाहाला निमंत्रण नसतानाही राग न धरता संभाजी व येसूबाई यांनी प्रथम पत्नीच्या मृत्यूनंतर राजारामाचे दुसरे लग्न स्वत: लावून दिले. संभाजी कायम युद्धावर असताना राज्यातील मुलकी कार्याची जबाबदारी त्याने येसूबाईवर सोपवली होती. राज्यातील इतर अनुभवी लोकांपेक्षा येसूबाईवर

संभाजीचा जास्त विश्वास होता. संभाजीच्या अनुपस्थितीत संपूर्ण राज्याची बातमी राखणे, गुन्हेगारांची वासलात लावणे, नजर कैदेत किंवा कैदेत दक्षता राखणे ही सर्व कामे येसूबाई जातीने करीत असे. राजधानीतील फितुरीला आळा घालण्याकरता तिने संपूर्ण दक्षता बाळगली होती. औरंगजेबाच्या विरुद्ध मराठी राज्यात जी प्रचंड शक्ती निर्माण झाली होती त्यावरून येसूबाईच्या कर्तृत्वाची साक्ष पटते. जिजामातोश्रींवर शिवाजी महाराजांनी आपल्या अनुपस्थितीत शिक्के व आज्ञा यांची जबाबदारी सोपविलेली होती. संभाजीने हा विश्वास येसूबाईवर समंजसपणे व्यक्त केला. हे पाहता येसूबाईच्या शहाणपणाचा व कर्तृत्वाचा अभिमान वाटल्याशिवाय राहत नाही. अर्थात नंतर तिने सुयोग्यपणे आपल्यावरील जबाबदारीचा केलेला उपयोग पाहता त्यावर शिवाजी महाराजांच्या वेळी तिला मिळालेल्या प्रशिक्षणाचा हा परिणाम असावा असे वाटते. अंतर्गत राज्यकारभाराच्या सुरक्षिततेकरता संभाजीने येसूबाईला तिच्या नावाचा शिक्का दिलेला होता. त्यानुसार ती संभाजीच्या पश्चात राजपत्रे 'राजाज्ञा' म्हणून काढू लागली.

सैन्यापासून सर्वसाधारण प्रजेला व देवदेवतांना दैनंदिन जीवनात इजा पोचू नये म्हणून येसूबाईने काढलेली अभयपत्रे प्रसिद्ध आहेत. चाफळच्या यात्रेसंबंधीचे तिचे पत्र सर्वश्रुत आहे.

संभाजींच्या कारकिर्दीत पाचाडला मंदिर बांधण्याचा निर्णय पतिपत्नींनी केला. संभाजीने तुळजापूरच्या देवीला नेमणूक पत्र (वार्षिक) दिले. त्यावर पत्रान्तर्गत येसूबाईची मुद्रा आढळते. यावरून तिच्या सुविद्यतेची कल्पना येते. प्रस्तुत पत्र संस्कृतमध्ये आहे.

संभाजी कवी कलुषाच्या जास्त आहारी जात आहे हे पाहून येसूबाईने त्याला आळा घालण्याचा प्रयत्न केला. कलुषा करीत असलेली अनुष्ठाने येसूबाई व अष्टप्रधान यांना मान्य नव्हती. संभाजी अष्टप्रधानांना जुमानत नसला तरी तो येसूबाईचा अनादर करील ही कल्पना इतिहासकारांना मान्य नाही. यामुळे येसूबाईने कवी कलुषाला रायगडी हिडीस अशी अनुष्ठाने करण्यास बंदी केली होती. याची जाणीव संभाजीला असल्यामुळे तो रायगडाला येताना मध्ये संगमेश्वरला थांबलेला दिसतो. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर येसूबाईने

संभाजीला मोलाचे सहकार्य केल्याचे दिसते. संभाजीने तिच्याकडे अंतर्गत राज्यकारभार सोपवलेला असला तरी येसूबाईची प्रत्येक आज्ञा संभाजी पाळेल अशी त्याकाळची परिस्थिती नव्हती. परंतु प्रसंगी कठोरपणे वागून तर प्रसंगी प्रेमाने वश करून घेऊन येसूबाईने संभाजीच्या राज्यकारभारात मोलाची कामगिरी बजावलेली दिसते. शिवाजी महाराजांच्या कालखंडात मिळालेल्या राजकारणी अनुभवाचा उपयोग तिने या दुसऱ्या कालखंडात केलेला दिसतो.

२५ मार्च १६८९ मध्ये झुल्फिकारखानाने रायगडाला वेढा घातला त्यावेळी संभाजी संगमेश्वरी होता.

## ३. संभाजीच्या वधानंतर येसूबाईची कर्तबगारी-

संभाजीच्या मृत्यूनंतर येसूबाईवर दु:खाचा डोंगर कोसळला. अशाप्रकारची घटना घडेल याची तिला यत्किंचितही कल्पना नव्हती. संभाजीच्या मृत्यूमुळे राजकारणात एक मोठी पोकळी निर्माण झाली. ती कधीच भरून निघाली नाही हे जितके खरे आहे तितकेच, त्याच्या मृत्यूमुळे मोगलांचे मनोगत सिद्धीस जाण्यायोग्य परिस्थिती निर्माण झाली. त्यामुळे स्वत:च्या दु:खाला आवर घालून स्वराज्यावरील संकट टाळण्यासाठी आत्मसमर्पणाची तयारी करणे येसूबाईला अपरिहार्य झाले. दिवंगत श्वशुराने स्थापन केलेल्या हिंदवी स्वराज्याची आपल्या डोळ्यांसमोर धूळधाण होऊ नये यासाठी तिने स्वत: बलिदान करण्याचे ठरवले. परंतु रामदासांनी सांगितल्याप्रमाणे-

''झुंजता झुंजता झुंजावे
प्राण आहे तोवरी''

म्हणजेच मराठ्यांचे बळ एकत्र करुन मोगलांशी लढा देणे आणि अशक्य होताच आत्मसमर्पण करून स्वराज्याचे संरक्षण करणे हाच आत्मसमर्पणामागे तिचा उदात्त हेतू होता, हे निश्चितच आहे. पण त्यामुळे मोगलांच्या विरोधाची धार बोथट होण्याची शक्यता होती. जिंजी-तंजावरास जाऊन स्वराज्याची नवी द्वाही फिरविणे आणि दूर अंतरावर नसणाऱ्या मराठ्यांच्या चिमुकल्या स्वराज्याला नष्ट होऊ न देणे हे काम राजारामाला करता आले.

हे चातुर्य, ही रणनीती तिने कुणाकडून उचलली ? अर्थात तिच्यासमोर

शिवाजी महाराजांसारख्या उत्तुंग व्यक्तिमत्त्वाचा आदर्श होता. म्हणजेच जिंजी-तंजावर भांडून घेतले शिवाजीने, योग्यवेळी तिचा उपयोग केला येसूबाईने. तिने छत्रपतीच्या सर्व वारसदारांसह मोगलांकडे जाण्याचा निर्णय घेतला असता तर मराठी इतिहासाचा तिथेच अंत झाला असता. केवळ येसूबाईच्या दूरदर्शित्वामुळे (द्रष्टेपणामुळे) राजारामाला जिंजी-तंजावरकडे पाठविले. तो तिकडे स्थिरस्थावर होईपर्यंत येसूबाई स्वत: रायगडी लढत राहिली. आणि आता राजाराम स्वत: निर्णय घेऊ शकतो असा विश्वास वाटताच, ती औरंगजेबासारख्या आपल्या पतीच्या हत्येला जबाबदार असणाऱ्या क्रूरकर्म्याच्या स्वाधीन झाली. यामध्ये मनाचा जो खंबीरपणा आवश्यक असतो तो क्वचितच पाहायला मिळतो. परंतु आपल्या भवितव्यापेक्षा स्वराज्याचे भवितव्य महत्त्वाचे वाटल्याने तिने हा निर्णय घेतला. वास्तविक सिंहाच्या गुहेत जाणाऱ्या श्वापदांची पावले दिसत होती. परत येणाऱ्यांची दिसत नव्हती. तरीही त्या गुहेत मोठ्या धैर्याने व आत्मविश्वासाने प्रवेश केला आणि चारित्र्यसंपन्नतेच्या बळावर औरंगजेबाच्या मनामध्ये स्वत:विषयी आदराचे स्थान निर्माण केले.

संभाजीच्या क्रूर वधानंतर संपूर्ण मराठा मंडळ ढवळून निघाले. येसूबाई छोट्या शाहूसह रायगडी होती. शिवाजी महाराजांच्या मृत्यूने झालेल्या हानीनंतर नुकतीच राज्याची घडी बसत असताना हा आघात मर्मी बसला. स्वत:चे डोंगराएवढे दु:ख गिळून येसूबाईने सर्व मराठी राज्यातील मुत्सद्दी योद्धे, प्रधान यांना रायगडावर बोलावून घेतले. इथे तिने घडवून आणलेली मसलत मुत्सद्देगिरीचा उत्तम नमुना म्हणून मानण्यात येते. भोसले घराण्यातील दोन्ही वारस -राजाराम व शाहू- हे एकत्र शत्रूच्या हाती सापडू नयेत म्हणून तिने राजारामास रायगड सोडून जिंजीस जाण्यास सांगितले. रायगडाबाहेरचा प्रदेश राजारामाने सांभाळावा असे सांगून रायगडाच्या संरक्षणाची जबाबदारी स्वत: येसूबाईने स्वीकारली.

येसूबाईने जवळ जवळ दहा महिने पर्यंत रायगडाचे संरक्षण मोठ्या शर्थीने केले. परंतु आता गड लढविणे शक्य नाही हे लक्षात आले त्यावेळी सर्वनाश टाळण्याकरता येसूबाईने यशस्वी माघार घेतली. रायगडावर असलेल्या अधिकारी मंडळींना तिने आपली कल्पना समजावून सांगितली. औरंगजेब हिंदू द्वेष्टा

असल्याने काय अनर्थ करेल याचा काही नेम नाही हे पाहून तिने झुल्फिकारखानाच्या स्वाधीन होण्याचे निश्चित केले. खानाकडून व बेगमेकडून स्वत:च्या व शाहूच्या संरक्षणाची हमी घेऊन तिने सर्वनाश टाळला. राजाराम व इतर मंडळी आपणास सोडून गेली आहेत तेव्हा आपण निराधार आहोत अशी बतावणी करून येसूबाईने मोगलांचा आश्रय घेतला. याकरता येसूबाईने मोगलांना बावीस किल्ल्यांच्या सोडचिठ्ठ्या लिहून दिल्या. शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीतील पुरंदरच्या तहावरून तिने हा धडा घेतला असावा. कारण बावीस किल्ले घेईपर्यंत मोगलांना दम पुरणार नाही याची येसूबाईला पुरेपूर जाणीव होती.

दिग्विजयी शिवाजी महाराजांची स्नुषा, पराक्रमी संभाजीची महाराणी असलेल्या येसूबाईला आयुष्याची महत्त्वाची १८-१९ वर्षे मोगलांच्या कैदेत अपमानास्पद स्थितीत व्यतीत करावी लागली. मराठ्यांची महाराणी म्हणून ज्या पुरोहित, संतमहंत, भिक्षुक यांच्यावर दानधर्माची खैरात केली त्या येसूबाईवर शत्रूच्या छावणीत असताना उपासमारीची पाळी आल्यामुळे चिंचवडच्या मोरया देवाकडे मदतीची याचना करावी लागली, यासारखे दुर्दैव नाही. व्यक्तिगत सुखदु:खाकडे लक्ष देण्यास येसूबाईला फुरसत नव्हती. तिचे सर्व लक्ष मराठी राज्याच्या संरक्षणाकडे लागलेले होते.

कैदेत असताना गुप्तहेरांमार्फत येसूबाईचा राजारामाशी संबंध होता. वेळोवेळी पत्राद्वारे तिने राजारामाला राज्यकारभारविषयक सूचना व मसलती दिल्याचे इतिहासात नमूद आहे. परंतु औरंगजेबासारख्या संशयी बादशहाला याचा किंचितही सुगावा लागू नये म्हणून तिला फार जागरूक राहावे लागत असे. राजारामाशी होत असलेल्या पत्रव्यवहारात चुकूनही संशयास्पद असे काही येसूबाई येऊ देत नसे. "आपला आमचा संकेत आहे तो परस्पर मनोगत आहे." अशा तऱ्हेचा सूचक उल्लेख ती पत्रात करीत असे. राजाराम स्वत:ला शाहूचा प्रतिनिधी समजत असे. या लहानशा कृतीचाही बोभाटा होऊ नये म्हणून तिने राजारामाला राजचिन्हे बाळगण्याची आज्ञा पत्राद्वारे केली. उलट बादशहासमोर राजारामाबद्दल आपल्याला यत्किंचितही प्रेम नाही. त्याने आपल्या मुलाला राज्याबाहेर काढून स्वत: राज्य बळकावले आहे अशी बतावणी तिला वेळोवेळी करावी लागत असे. औरंगजेबासारखा मुत्सद्दी या बनावाने फसणे शक्य नव्हते.

परंतु तो अगतिक झालेला होता. दक्षिणेत त्याच्या राज्यात बेदिली निर्माण होऊ पाहात होती. याचा फायदा येसूबाईने घेतलेला दिसतो.

औरंगजेबाच्या कैदेत असताना शाहू विवाहयोग्य झाल्यामुळे त्याचा विवाह प्रतिष्ठित मराठा घराण्यातील दोन वधूंशी लावण्यात आला. शाहूवर प्रेम करणाऱ्या औरंगजेबाने वधूला पाहण्याची इच्छा प्रकट केली असता येसूबाईने बेगमेला आपल्या बाजूने वळवून घेऊन विरुबाई नावाच्या दासीला औरंगजेबाकडे पाठविली. मराठ्यांच्या चालीरीतींना मोठ्या इतमामाने जपणाऱ्या येसूबाईला कैदेत असताना अशाही प्रसंगाला तोंड देऊन मराठी संस्कृतीचे जतन करावे लागले. औरंगजेबाशी तिचे वर्तन अतिशय संयमाचे व समजुतीचे होते. त्यामुळे शाहूवर खूष होऊन औरंगजेबाने त्याला सातहजारी मनसब दिली. परंतु त्याच्या कारभाराचा अधिकार येसूबाईला देण्यात आला. येसूबाईला याबाबत दिलेला फारशी शिक्का इतिहासात प्रसिद्ध आहे. एकाच वेळी लहान शाहूवर मराठी संस्कृतीचे संस्कार करावयाचे, मराठी राज्याबद्दल, आपल्या माणसाबद्दल त्याच्या मनात प्रेम निर्माण करायचे, परंतु मोगलांबद्दल द्वेष वाटत असून व्यक्त करायचा नाही, अशी कसरत येसूबाईला करावी लागत होती.

इ.स. १७०७ मध्ये औरंगजेबाचा मृत्यू झाला. त्यानंतर शाहूची मुक्तता करण्यात आली. मात्र येसूबाईला ओलीस म्हणून दिल्लीला नेण्यात आले. दक्षिणेत राजारामाच्या इ. स. १७०० मध्ये झालेल्या मृत्यूनंतर त्याच्या पत्नीने, ताराबाईने औरंगजेबाशी संघर्ष सुरू ठेवलेला होता. राज्याचा कारभार ताराबाईने आपल्या मुलाच्या नावाने स्वतःच्या अधिकारात घेतला होता. राजारामाच्या दुसऱ्या पत्नीने -राजसबाईने आपल्या मुलाच्या नावाने कोल्हापूरला दुसरी राज्य गादी निर्माण केली होती. ज्या मराठी राज्याच्या अभंगतेकरता येसूबाईने स्वतःचे आत्मसमर्पण करून राज्य एकछत्री राखण्याचा प्रयत्न केला, त्या राज्याचा खरा वारस शाहू जिवंत असताना व्यक्तिगत स्वार्थासाठी तुकडे करण्यात आले.

१८ वर्षांच्या कैदेनंतर इ.स. १७१८ मध्ये येसूबाई स्वतःच्या मुलाच्या राज्यात सन्मानाने परत आली. तिने अनेक ऐतिहासिक सल्ले व न्यायनिवाडे

केलेले पत्रात नमूद आहेत. धार्मिक आज्ञाही तिने काढल्याचे इतिहासात प्रसिद्ध आहे.

स्वत:च्या सद्वर्तनाने व सौजन्यपूर्ण वागणुकीने औरंगजेबासारख्या शत्रूच्या राज्यातही ज्या येसूबाईने स्वत:चे स्वत्व निर्मळ राखले अशा स्त्रीवरही तिच्या निंदेची धूळ काही छिद्रान्वेषी लोकांनी उडविलेली दिसते. परंतु या प्रकाराला एकाही इतिहासकाराने किंवा संशोधकाने पुष्टी दिलेली दिसत नाही. या सर्व अग्निप्रलयातून स्वत:च्या शुद्ध वर्तनाने ही स्वाभिमानी येसूबाई सोनपुतळी होऊन बाहेर पडली.

**सुशिक्षित येसूबाई-**

कोणत्याही संस्कृतीचा मोठेपणा हा त्या समाज संस्कृतीतील स्त्रियांच्या दर्जावरून मोजता येतो. पुरुषांच्या राजकारणात, व्यवहारात, धर्मअर्थादि व्यवहारात स्त्रियांचे सहकार्य किती आहे यावरून समाजाची सुजाणता आणि न्यायबुद्धीची कसोटी लावता येते. घरातील एक स्त्री सुशिक्षित झाली की संपूर्ण घर सुशिक्षित होते असे म्हटले जाते.

वेदकालात स्त्रिया आचार्या, उपाध्याया, गणिती, कवयित्री, वेदाभ्यास करणाऱ्या होत्या. अनेक विदुषी स्त्रियांचे उल्लेख वेदवाङ्मयात आढळतात.

सतराव्या -अठराव्या शतकात मात्र स्त्रीशिक्षणाची प्रगती समाधानकारक आढळत नाही. परंपरागत आचारधर्मावर भर देणारा हा काळ होता.

मुसलमानी आक्रमणानंतर साक्षरतेचे प्रमाण आणखी कमी झालेले दिसते. मध्ययुगात सर्व समाजावर धर्माची पकड फार मोठ्या प्रमाणावर होती. त्यामुळे घराघरांतून होणाऱ्या धार्मिक पठणामुळे स्त्रिया सुसंस्कृत होत असत. मात्र साक्षर नव्हत्या. शिवशाहीतील मराठ्यांच्या स्त्रिया मात्र साक्षर आढळतात. जिजाबाई, येसूबाई, ताराबाई, शाहूच्या राण्या, दाभाडे, शिंदे, शिर्के या स्त्रियांची अनेक पत्रे उपलब्ध आहेत.

संभाजीने राज्यातील मुलकी कारभार आपली पत्नी महाराणी येसूबाई हिच्यावर टाकलेला दिसतो. व संभाजी राजाची आज्ञा याऐवजी 'राजाज्ञा' लिहिण्याचा नवा शिरस्ता पडलेला आढळतो. (शिव च.सा. खंड १)

प्रतिनिधित्वाचा जो अधिकार येसूबाईस मिळाला तो राजारामकालीन प्रतिनिधिपदाची सुरुवात सुचवितो. येसूबाईंचा स्वत:चा असा शिक्काही "श्रीसखी राज्ञी जयति" असा आढळतो. त्यानुरूप ती सर्व राजपत्रे व कौलनामे वगैरे काढून राजव्यवस्था पाहात होती असे दिसते.

माहेरहून व सासरहून सुशिक्षणाचे संस्कार प्राप्त झालेली येसूबाई अतिशय सुविद्य होती. औरंगजेबाच्या कैदेतून चिंचवडच्या मोरया देव यांना पाठविलेले येसूबाईचे पत्र म्हणजे अक्षरवाङ्मयाचा नमुनाच म्हणावा लागेल. स्वत:च्या हलाखीच्या परिस्थितीचे वर्णन करताना तिने कुठेही वाङ्मयीन मर्यादा ओलांडलेल्या दिसत नाहीत. "चि.दाजी तो पृथ्वीपती समागमे गेले" या उल्लेखाची मांडणीची पद्धत अतिशय सुरेख आहे. अहमदनगरच्या सावकारांनी येसूबाईला पैसे देण्याचे नाकारले या करुणपूर्ण अनुभवाचे वर्णन ती मोठ्या कष्टाने लिहिते. ज्या सावकारांना मराठी राज्यात आश्रय मिळालेला होता, त्या मराठी राज्याची निराश्रित राणी सावकारांबद्दल लिहिताना कुठेही कटुता धरून वावगा शब्द लिहीत नाही. प्रतिकात्मक तऱ्हेने याचे वर्णन ती "इंगळास वोळंबे लागले." (वाळवीने अग्नी भक्षण केले किंवा अग्नीला तृण मिळाले.) अशा तऱ्हेने करते. यावरुन तिच्या सुसंस्कृततेची, सुविद्यतेची कल्पना येते.

प्रत्यक्ष हातात तलवार घेऊन येसूबाईने रणांगण गाजविले नसेल. त्यामुळे इतिहासात व्हावी तशी तिची प्रसिद्धीही झाली नसेल. परंतु आपल्या मुत्सद्दीगिरीने, शहाणपणाने आणि सौजन्यपूर्ण वागणुकीने येसूबाईने मराठी राज्याची शकले होऊ न देता त्याला एकसंधी, स्वयंपूर्ण बनविण्यात मदत केली हे नाकारता येत नाही.

इ.स. १६६५ ते १७२० या कालखंडात प्रसिद्धीस पावलेल्या मराठ्यांच्या इतिहासातील स्त्रिया म्हणजे मुख्यत: जिजाबाई, सोयराबाई, ताराबाई, राजसबाई. मराठी राज्याच्या स्थापनेपासूनचा हा काल आहे. वरील स्त्रियांनी आपल्यापरी कर्तृत्व गाजवले असेल. परंतु मराठी राज्याच्या संवर्धनाकरता १८-१९ वर्षे मोगलासारख्या शत्रूच्या कैदेत राहूनही स्वराज्याचा ध्यास घेणारी येसूबाईसारखी स्त्री आपणाला आढळत नाही.

स्त्रीसुलभ विनय, पतीपरायणता, सौजन्य, ममता, प्रेमळपणा, सात्विकता, चारित्र्य संपन्नता या गुणांचा समुच्चय येसूबाईच्या ठिकाणी होता. त्याचबरोबर राजकारण कुशलता, मुत्सद्देगिरी, धैर्य, हजरजबाबीपणा, दृढनिश्चय यांसारख्या एखाद्या कसलेल्या मुत्सद्दी माणसाचे तिच्यातील गुणही प्रसंगोपात आपल्या दृष्टोत्पत्तीस आले आहेत. धार्मिक आणि सामाजिक ज्या आज्ञा तिने वेळोवेळी काढल्या आहेत त्यावरून तिच्या धार्मिक वृत्तीची कल्पना येते. साहित्य विषयक गुणही तिच्यात फार मोठ्या प्रमाणावर आढळतात. तिच्या पत्रांतून, वागण्यातून सुसंस्कृततेची खात्री पटते.

अशा सर्वगुणसंपन्न स्त्रीच्या आयुष्यातील घटना व कार्य हे केवळ तिच्या प्रसिद्धि - पराङ्मुख स्वभावामुळे आजपर्यंत अंधारात राहिले. त्यावर प्रकाश टाकण्याचा हा अल्पसा प्रयत्न.



: ७ :

# येसूबाईची श्रेष्ठता

वैयक्तिक आयुष्यात येसूबाईला अनेक चढउतार सामान्य स्त्रीप्रमाणेच सोसावे लागले. परंतु येसूबाईचे वैशिष्ट्य हे की, तिने सांसारिक भावभावनांची सांगड मराठी राज्याशी घातली नाही. उलट मराठी राज्याच्या संरक्षणाकरिता व उत्कर्षाकरिता स्वत:चे वैयक्तिक मानमरातब बाजूला सारून स्वत:च्या सुखाची आहुती दिली.

शिर्के यांच्यासारख्या मराठा मातबर अशा घराण्यातून येसूबाईने साधारणत: इ.स. १६६१ ते ६५ च्या दरम्यान भोसले घराण्यात प्रवेश केला. इतिहासकार पारसनीस यांच्या मते शिर्के हे सूर्यवंशी अस्सल क्षत्रिय होते हे सिद्ध होते. शिर्के यांनी अनेकदा मुसलमान सुलतानांशी शूरपणे मुकाबला केला होता. संकेश्वरच्या किल्ल्याच्या साक्षीने शिर्के यांनी मलीकउत्तुजार याचा पराभव केला. शिर्क्यांच्या पराक्रमाचे रसभरीत असे वर्णन दळवी, शेरवानी, कुंटे वगैरे इतिहासकारांनी केले आहे. परंतु येसूबाईचे वडील पिलाजी शिर्के हे शेवटपर्यंत कुणाचे तरी सरदार म्हणूनच, कधी सुर्वे यांच्याकडून तर कधी विजापूरच्या पातशहाकडून लढत असत. विजापूरच्या अदिलशहाकडून त्यांना दाभोळचे वतन मिळाले होते. त्या वतनावर शिर्के मंडळी समाधान मानून होती. स्वतंत्र राज्याची कल्पना त्यांच्या आसपासही फिरकत नव्हती.

भोसले घराण्यात प्रवेश केल्यानंतर शिवाजी महाराजांच्या स्वराज्याविषयक कल्पना, त्याच्याकरता महाराजांनी घेतलेले कष्ट व प्रसंगी शौर्याबद्दल राजकारणाचा मांडलेला पट, ह्या सगळ्याचा परिणाम येसूबाईवर नक्कीच होत होता. स्वराज्याची कल्पना ही माहेरी अस्तित्वात नव्हती. ती सासरी प्रत्यक्षात अनुभवल्यामुळे येसूबाईच्या आयुष्याची दिशाच बदलून गेलेली दिसते. अर्थात या अनुभवातून नेमके काय घ्यायचे व कशाचा त्याग करायचा याचा सारासार विचार करण्याइतकी येसूबाई बुद्धिमान होती, हे पुढील चर्चेवरून आपल्याला कळून येते.

शिवाजी महाराजांचा वैयक्तिक तसेच राजकारणातील आचरणाचा आदर्श लहानपणापासून येसूबाईच्या समोर होता. भोसले राजघराण्यातील पहिली सून म्हणून येसूबाई जिजामातोश्री व सोयराबाईसह सगळ्यांचा कौतुकाचा विषय होती. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेक प्रसंगी युवराज संभाजीची युवराज्ञी म्हणून येसूबाई मानसन्मान भोगत असताना आजूबाजूच्या परिस्थितीचा मोठ्या बारकाईने अभ्यास करत असणार. कारण त्याचे प्रतिबिंब तिच्या आयुष्यातील अनेक घटनांवर पडलेले दिसते. संभाजीच्या गैरवर्तनाच्या अफवा ऐकून विचलित न होणारी ती संभाजीशी शेवटपर्यंत तेवढीच एकनिष्ठ राहिली. मराठी राज्याचा भावी वारस संभाजी याच्या वर्तनाविरुद्ध उठलेल्या अफवांमुळे पुढे राज्याच्या वारसासंबंधीचे वादळ निर्माण झाले व त्याचा परिणाम आपसांत दुही निर्माण झाल्यामुळे राज्याच्या सुरक्षिततेलाही त्याचा धोका निर्माण झालेला दिसून आला. अशावेळी येसूबाई मोठ्या हिमतीने राज्याच्या बळकटीकरता संभाजीच्या मागे उभी राहिलेली दिसते.

शिवाजी महाराज व संभाजी या पितापुत्रांच्या संबंधापेक्षा येसूबाई व संभाजी या पतीपत्नीच्या संबंधाचे स्वरूप मुळातच वेगळे होते. पिता पुत्राने केलेल्या दुष्कृत्याचा जाब विचारू शकतो. प्रसंगी शिक्षा किंवा दंडही ठोठावू शकतो. परंतु पत्नीने पतीच्या दुर्वर्तनाचा उल्लेख उच्चारणे म्हणजे सुद्धा पाप. अशा तऱ्हेचा तो काळ होता आणि येसूबाई ही स्त्री मुळातच वेगळ्या मुशीतून जन्माला आलेली आहे. जिजामातोश्रींच्या मृत्यूनंतर तिला पोरक्या संभाजीकडून पत्नीच्या प्रेमाने व मातेच्या ममतेने काम करून घ्यावे लागले. संभाजीने येसूबाईकडे अंतर्गत राज्यकारभार सोपवला होता; जसा शिवाजी महाराजांनी मातोश्री जिजाबाईकडे दिला होता याचे वर्णन बखरकर आवर्जून करतात. परंतु पत्नी व माता या दोन नात्यांत जमीन - अस्मानाचा फरक असल्यामुळे राज्यकारभार सोपविण्यातही नक्कीच फरक आहे. राज्य व राज्यकारभार याच्यातील फरकही परिस्थितिजन्य आहे. शिवाजी महाराजांना राज्य शून्यातून निर्माण करावयाचे होते. राज्यनिर्मितीच्या ध्येयाने भारलेल्या राजाची, प्रजेची भावना आत्मसमर्पणाची असते, स्वातंत्र्य मिळाल्यावर ती भावना, त्या निष्ठा कितपत टिकून राहतात याचा अनुभव आपल्याला आहे. स्वत:ला कसलेही कष्ट न पडता मिळालेल्या

राज्याचे रक्षण करताना मुळातल्या निर्मितीच्या वेळी असलेली आत्यंतिक तळमळ नक्कीच नसते. हाच फरक शिवाजी महाराज व संभाजी यांच्या आलेल्या अनुभवातून येसूबाईला दिसून येत होता.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर औरंगजेबासारखा बलाढ्य शत्रू दक्षिणेत कोवळे मराठी राज्य नामशेष करण्याचा विडा उचलून आला होता. यावेळी दरबारी अधिकारी मंडळी व आप्तस्वकीय यांच्यापेक्षा संभाजीला येसूबाईचाच आधार मोलाचा होता हे दिसून येते. सभासद बखरीत शिवाजी महाराजांनी आपल्या मागे राज्याच्या वारसाबद्दल व संरक्षणाबद्दल जे उद्‌गार काढले आहेत त्यातील "संभाजी राजे वडील पुत्र जाणता आहे." हे सोयिस्कररीत्या बाजूला सारून सगळ्या मंत्रिमंडळातील लोकांनी व आप्त- स्वकीयांनी पुढे संभाजीच्या दुर्गुणाचे महाराजांनी केलेले वर्णन पुढे करून संभाजीला वारस म्हणून विरोध करायला सुरूवात केली. या स्वराज्याच्या वारसाच्या युद्धात सगळ्यांनाच स्वराज्याच्या संरक्षणाचे विस्मरण झाले होते. यावेळी येसूबाई मात्र राज्य संरक्षणाच्या काळजीत दिसते. शिवाजी महाराजांचे येसूबाईने जे निरीक्षण केले होते त्यावरून येसूबाईला नक्कीच खात्री होती की, संभाजीच्या दुर्वर्तनाबद्दल शिवाजी महाराजांना खात्री असती तर त्यांनी नक्कीच आपल्या मागे स्वराज्याचा छत्रपती राजारामाला करावे, दुर्वर्तनी संभाजीला करू नये असे स्पष्ट सांगितले असते. कारण शिवाजी महाराज कुणाचाही विनाकारण मुलाहिजा बाळगणारे नव्हते. संभाजी दुर्वर्तनी असला तरीही शौर्य, पराक्रम व स्वधर्म यांबद्दल त्याला तीव्र अभिमान आहे याची जाणीव महाराजांना होती. तसेच येसूबाईच्या कर्तृत्वाबद्दलही त्यांना सार्थ अभिमान होता.

मोगली विळख्यापासून मराठी राज्य बचावण्याकरता संभाजीच्या पराक्रमी वृत्तीला आव्हान देऊन येसूबाईने त्याची अंतर्गत राज्यकारभाराची बाजू समर्थपणे सांभाळली. जिजाबाईला "चवथा वाडा मोर्तबसुद" असा शिक्का होता तसाच येसुबाईचा "श्री सखी राज्ञी जयति" असा होता. तो काळ मोगली आक्रमणापासून व अंतर्गत अशांततेमुळे धामधुमीचा असल्यामुळे येसूबाईची पत्रे संख्येने जिजाबाईपेक्षा कमी असली तरी पत्रातील साहित्यिक गुणांमुळे ती अक्षर वाङ्मय ठरली आहेत. संभाजीच्या आततायी स्वभावाला आपल्या समंजस वागण्याने आळा घालण्याचा प्रयत्न येसूबाईने केला. कलुषाच्या नादी

लागून अनेक हिडीस अनुष्ठाने संभाजी करीत असे. त्याला राजधानीपुरती मर्यादा येसूबाईने घालून दिली. संभाजीच्या असमंजस व आततायी वर्तनाने दुखावलेल्या सगळ्या राजप्रतिनिधींना व आप्तांना तिने मोठ्या कुशलतेने राज्याच्या रक्षणाकरता प्रवृत्त केले.

संभाजीच्या क्रूर वधानंतर तर येसूबाईच्या अनेक मुत्सद्दी गुणांना कर्तबगारीची जोड मिळाल्याने, तिने राज्याच्या संरक्षणाकरता घेतलेले नि:स्वार्थी निर्णय हे इतिहासात अजरामर झाले आहेत. रायगडाला १६८९ मध्ये झुल्फिकारखानाने वेढा घातला. त्यावेळी येसूबाईने राजारामाला रायगडाबाहेर जायला सांगितले. स्वराज्याचे दोन्ही वारस राजाराम व शाहू हे एकत्र शत्रूच्या हाती सापडू नयेत म्हणून तिने हा निर्णय घेतला. राजारामाला राजचिन्हे धारण करण्याचा आग्रह ती करते, औरंगजेबाला संशय येऊ नये म्हणून, परंतु स्वत:च्या मुलाचा हक्क असताना त्याला बाजूला सारून दिराला राज्याधिकारी केवळ शत्रूची स्वराज्यावरील पकड कमी करण्याकरता देणे, या तऱ्हेचे कृत्य मराठ्यांच्याच काय परंतु संपूर्ण देशाच्या इतिहासात असलेले ऐकिवात नाही. अनेक तऱ्हेचे पराक्रम करून जे यश मिळणार असेल ते फक्त या येसूबाईच्या एकाच प्रसंगाने तिला संपूर्ण इतिहासात श्रेष्ठत्व प्राप्त करून देण्याला पुरेसे आहे. औरंगजेबासारखा प्रबळ शत्रू मराठी राज्याच्या विध्वंसाकरता सर्व शक्तीनिशी समोर उभा असताना व ज्याने स्वत:च्या पित्याची अत्यंत क्रूरपणे हत्या केली आहे हे माहीत असताना स्वराज्याच्या भावी वारसासह मोगलांच्या स्वाधीन होणे हा आगळावेगळा निर्णय येसूबाईने घेतला. ज्यावेळी हा निर्णय घेतला तेव्हा तिने सर्व राजप्रतिनिधींचे सार्वमत घेतले होते. शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत शहाजी राजाला सोडविण्याकरता कोंडाणा अदिलशहाला देऊन घेतलेली माघार किंवा जयसिंहाबरोबर केलेल्या पुरंदरच्या तहाने अनेक किल्ले मोगलांना देऊन उरलेल्या राज्याचा केलेला बचाव, याच्या तुलनेत येसूबाईने रायगडावर घेतलेला निर्णय कमी महत्त्वाचा नाही.

८ मे १७०७ ला शाहूला सोडण्यात आले. परंतु येसूबाईला मात्र ओलीस म्हणून दिल्लीला नेण्यात आले. दक्षिणेत १७०० ला राजारामाच्या मृत्यूनंतर ताराबाईने आपला मुलगा दुसरा शिवाजी याच्या नावाने राज्यकारभार सुरू केला

व आपण राजारामाच्या मागे राज्य सांभाळले या एका मुद्द्यावर व्यक्तिगत स्वार्थाकरता पूर्वीचे सगळे राज्य नियम झुगारून दिले. संभाजीच्या मृत्यूनंतर, "शिवाजी महाराजांनी निर्माण केलेले राज्य संपले" असा नवीन हास्यास्पद मुद्दा ताराबाईने उपस्थित केला. राजारामाची दुसरी पत्नी राजसबाई हिने आपल्या मुलाकरता कोल्हापूर येथे दुसरी गादी निर्माण केली. ज्या मराठी राज्याच्या अखंडतेकरता येसूबाईने राजारामाला राज्य देण्याचा मनाचा मोठेपणा दाखवला त्या राज्याची स्वत:च्या स्वार्थी अभिलाषेकरता दोन शकले करण्यात आली. आपसांतील या वैराचा परिणाम मराठी राज्यावर फार मोठा झालेला दिसतो. कोल्हापूरच्या रामराजाच्या वेळी त्याच्या राजपदाच्या अस्तित्वाबद्दल निर्माण झालेली शंका निरसन करण्याकरता संपूर्ण मराठा मंडळाला सांगोला येथे एकत्रित येऊन निर्णय घ्यावा लागला. वैयक्तिक स्वार्थाकरता राजघराण्याची प्रतिष्ठा अशा तऱ्हेने चव्हाट्यावर आली.

शाहूने साताराची गादी घेतल्यानंतर करवीर घराण्याशी त्याचे तणावाचे संबंध होते. १७३० ला झालेल्या वारणेच्या तहाने समझोता घडून आला. राजकारणातील जहर पचविलेल्या येसूबाईने पुढाकार घेऊन कोल्हापूरकर व शाहू यांच्यातील संबंध सलोख्याचे घडवून आणले. येसूबाईच्या मृत्यूनंतर शाहूला लिहिलेल्या पत्रात कोल्हापूरच्या संभाजीने येसूबाईबद्दल गौरवोद्गार काढले आहेत.

वारणेच्या तहामुळे संभाजी - शाहू संबंध सुधारले. त्यानिमित्ताने दोन-भावांमधील पत्रव्यवहार महत्त्वाचा आहे. संभाजी राजे यांनी शाहू महाराजांना मुद्दाम पत्र पाठवून येसूबाईसंबंधीचा आपला आदरभाव आणि आगमनाबद्दलचा आनंद व्यक्त केला आहे. य.रा.गुप्ते यांच्या संग्रही असलेल्या पत्रातील मजकूर तसेच करवीर छत्रपती घराण्याचा इतिहास गुजर संग्रही असलेल्या पत्रावरच्या भाग १ पृष्ठ ७ वरून, "श्रीमंत सकल तीर्थस्वरूप राजश्री यासी श्री दाजी वडिलांचे सेवेशी अपत्ये संभाजी राजे कृतानेक दंडवत विनंती उपरी येथील कुशल श्रीकृपे वडीलांचे आशीर्वाद जाणोन वडिली आसीर्वाद पत्र पाठवून समाधान पावविले पाहिजे. विशेष तीर्थस्वरुप मातुश्री काकीसाहेब आली, दर्शन झाली ते वर्तमान राजश्री बाबजी प्रभु यांनी त्यावरून परमसंतोष जाला. परंतु वडिली हे संतोषवृत्त

लिहिले नाही हे अनुचित. तसेच निरंतर वडिलांचे आसिर्वाद पत्र यावे. हे अपेक्षा थैसे असता आम्ही पाठविलेल्या पत्राची उत्तरेही येत नाहीत. हे वडीलांचे ममतेस विहीत की काय ? या उपरी थैसे न होता घडी घडी आसीर्वाद पत्र पाठवून समाधान होय ते गोष्टी केली पाहिजे. राजश्री बाबाजी प्रभु पाठविले आहेत त्यांनी सविस्तर विंनती केलीस असेल. प्रस्तुतही हे विनंती करतील, तदनुरुप निर्वाह होऊन उभयपक्षी किर्तीस्पद होय. ते करणार वडिल विवेकी आहेत. बहुत काय लिहीणे तरी वडिल सुज्ञ आहेत मोर्तब.''

१३ एप्रिल १७३० रोजी शाहू महाराजांबरोबर संभाजी राजे यांचा वारणेचा तह झाला. या तहाला गती कशी मिळाली ? रियासतकार सरदेसाई यांनी या बाबतीत म्हटले आहे, ''प्रत्यक्ष उपक्रम कोणी व कसा सुरू केला हे समजत नाही, प्रतिनिधी भगवंतराव पंत अमात्य ताराबाई इत्यादिकांच्या मध्यस्थीने सख्य घडून आले व (शाहू महाराज व संभाजी राजे) भेटी व्हाव्या असे ठरले.'' या संदर्भात संभाजी राजे यांनी शाहू महाराजांना लिहिलेले एक पत्र पुढीलप्रमाणे उपलब्ध आहे. त्या पत्रात म्हटले आहे, ''तीर्थस्वरुप मातोश्री साहेबी वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षी स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा म्हणून वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला. तरी हे गोष्टी वडिलास उचितच आहेत. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभयपक्षी निर्दोष कीर्ती व्हावे हेच आम्हास अगत्य आहे. या अगोदरच मातोश्री साहेबी राजश्री बाबाजी प्रभु यांसी पाठवावयासी लिहिले होते. तेव्हाच पाठवावे तरी त्यांचे शरीरी सावकाश नव्हते.'' पृ. १३ ऐतिहासिक पत्रव्यवहार, भारत वर्ष अंक ९ पृ. ८९ यांत या पत्राचा उल्लेख आहे. या पत्रात ''तीर्थस्वरूप मातोश्री साहेबांनी उभयपक्षी विवेक घडून यावा'' म्हणून सुचविले असे म्हटले आहे.

करवीर रियासत यांत स.मा. गर्गे यांनी पृष्ठ १९८ वर जो खुलासा केलेला आहे तोच योग्य वाटतो. ते म्हणतात, ''या पत्रातील मातोश्री साहेब हे शब्द ताराबाईंना उद्देशहून लिहिले नसावेत हे दर्शविणारा महत्वाचा पुरावा या पत्राच्या आरंभीच नमूद झालेला आहे. या पत्रात मातोश्री साहेब या शब्दामागे 'तीर्थस्वरूप' असे म्हटलेले आहे. मराठी लेखन पद्धतीत पत्राच्या मायन्यालाही काही निश्चित अर्थ प्राप्त झालेले आहेत. त्याला अनुसरून आई आणि वडील

(माता-पिता) यांना तीर्थरूप म्हटले जाते व चुलत, मावस व तत्सम आदरणीय व्यक्तींना तीर्थस्वरूप म्हटले जाते. एखाद्यावेळी मातापित्यासमान असलेल्या किंवा मानलेल्या व्यक्तीलाही तीर्थरूप असे संबोधून पूज्य भाव दाखविला जातो. पण मातापित्याला मात्र तीर्थस्वरूप असे कदापि म्हटले जात नाही. (महाराष्ट्र शब्दकोश, विभाग ४ पृ. १५४३)याचा निर्वाळा गर्गे देतात. या पत्रावरून असे दिसते की, ''येसूबाईने तहासंबंधीची मध्यस्थी सुरू केली. दरम्यान त्यांचे निधन झाले आहे.'' तहाची पूर्तता होण्यापूर्वीच येसूबाईचे काही महिने अगोदर निधन झाले, हे यावरून लक्षात येते. कारण तहाची बोलणी सुरू असताना संभाजीचे शाहूला येसूबाईच्या निधनाबद्दल सांत्वनाचे पत्र आहे.

मराठी रियासतीत मध्य विभागात भा.५ पृ. ४३३ वर सरदेसायांनी उल्लेख केला आहे. येसूबाईच्या निधनाबद्दल संभाजी राजे यांनी शाहू महाराजांना सांत्वनपर पत्र पाठविले ते असे, ''श्री सकल तीर्थस्वरूप राजश्रीया विराजमान राजश्री शाहू राजे दाजी वडीलांचे सेवेसी अपत्य संभाजी राजे दंडवत विनंती उपरी, वडिली आशिर्वाद पत्र पाठाविले. ते प्रविष्ट झाले. मातुश्री येसूबाईसाहेब यांसी वेथा होऊन कैलासवास जाला म्हणोन लिहीले. यावरून ममताविषये चित्तास परमखेद प्राप्त झाला. हा अयत्नी मार्ग ऐसाच आहे. वडील सर्वज्ञ आहेत. विवेक करून चित्ताचे सांत्वन होय ते केले पाहिजे. विशेष लिहावे तरी वडील सूज्ञ आहेत.'' या पत्रातील उल्लेख आणि भाषा ही दोन्ही शाहू महाराज आणि संभाजी राजे यांचा सलोखा झाल्यानंतरच उपयोगात आणली जाऊ शकते. वारणाच्या तहापूर्वी अनेक वर्षे या दोघांचा पत्रव्यवहार नव्हता. शाहूने येसूबाईच्या मृत्यूसंबंधी कळविल्यावरून संभाजीचे पत्र आलेले दिसते. संभाजी निजामाला मिळू नये म्हणून केलेल्या येसूबाईच्या मध्यस्थीचे हे फळ आहे. हे निर्विवाद सिद्ध झाले आहे.

स्वत:च्या कर्तबगारीने राजकारणाचे निर्णय घ्यायचे परंतु राज्याला स्थैर्य आले व ते योग्य व्यक्तीच्या हातात सोपविल्यानंतर स्वत: राजकारण संन्यास घेऊन अलिप्त राहणे हे किती कर्तबगार लोकांना शक्य होते? येसूबाईचे वैशिष्ट्य यातही दिसून येते. शाहू गादीवर आल्यानंतर त्याच्या राजकारणातील निर्णयात येसूबाईने हस्तक्षेप केला नाही. माधवराव पेशवे यांच्या मातोश्री गोपिकाबाई व

येसूबाई यांच्यात हाच मोठा फरक आपल्याला जाणवतो.

पेशवेकालीन स्त्रियांमध्ये प्रसिद्ध गोपिकाबाई यांनी माधवरावावर दबाव ठेवण्याचा केलेला प्रयत्न व आनंदीबाईने असमंजसपणे राजकारणात राघोबाकडून करविलेल्या चुका येसूबाईच्या कारकिर्दीत कुठेच आढळत नाहीत. कारण येसूबाईला स्वतःच्या कर्तृत्वाच्या अहंमन्यतेपेक्षा राज्याच्या महत्ततेची जाण अधिक होती, हे स्पष्ट दिसून येते.

एकंदरीत विचार करता मराठा कालखंडात निर्माण झालेल्या राजकारणी स्त्रियांशी तुलना केल्यास येसूबाईचे स्थान हे कोणाच्याही स्थानाहून गौण नसल्याचे जाणवते. उलटपक्षी शिवाजी आणि जिजाबाई, संभाजी आणि येसूबाई, माधवराव व माता गोपिकाबाई, रघुनाथराव व आनंदीबाई यांचा विचार केल्यास आपणास असे जाणवते की येसूबाईचे व्यक्तिमत्त्वम्हे असाधारण असे आहे. शिवाजी राजांना मातोश्री जिजाबाईबद्दल नितांत आदर होता. त्यामुळे आईच्या आशीर्वादातून राजकीय निर्णय घेणे हे तुलनात्मक दृष्टिकोणातून सुलभ होते. येसूबाई ही संभाजीची-पत्नी एका उपेक्षिताची पत्नी म्हणून दोघांमध्ये भावनिक जवळीक असणे वेगळे आणि या भावनेचा उद्रेक राजकारणात होऊ न देणे वेगळे. येसूबाईने हे पथ्य उत्तमरीतीने पाळल्याचे दिसते. संभाजीच्या प्रेमाची गरज पूर्ण करून आपल्या नैतिक आचरणाने त्याच्या मनामध्ये विशेष आदराचे स्थान निर्माण करणे आणि त्यामधून राजकारणास योग्य वळण देणे हे येसूबाईचे कौशल्य मराठा कालखंडातील कोणत्याही स्त्रीला साधल्याचे दिसत नाही.

संभाजीच्या मृत्यूनंतर तर परिस्थिती आटोक्याबाहेर गेली. शाहूला छोटीशी जहागीर प्राप्त करून मोगलाईशी मैत्रीचा करार करून उर्वरित आयुष्य येसूबाईला समकालीन प्रथेप्रमाणे ऐष आरामात घालविता आले असते. परंतु वैयक्तिक सुखापेक्षा मराठी राज्याचे महत्त्व तिला मोठे वाटत असल्याने, शिवाजी महाराजांनी निर्माण केलेले स्वराज्य कोणतीही किंमत देऊन वाचविलेच पाहिजे, असा तिचा दृढ निश्चय होता. त्याकरता स्वतःचे अथवा पुत्र शाहूचे बलिदान झाले तरी चालेल. म्हणूनच तिने स्वतःच्या किंवा शाहूच्या वारसाहक्काचे स्तोम किंवा अवडंबर न माजवता राजारामाकडे सर्व सूत्रे सुपुर्द केली. आणि पुत्रासह औरंगजेबाची कैद पत्करली. औरंगजेबाच्या कैदेत जाण्यास जे मानसिक धाडस

लागते ते फक्त येसूबाईजवळ होते.

स्वातंत्र्याचे महत्व जाणण्यासाठी हौतात्म्य पत्करावे लागते. मराठी राज्याचे नशीब बलवत्तर म्हणून येसूबाई - औरंगजेबाच्या कैदेत असलेली अस्मिता अक्षत परत आली. तिच्या कैदेत असल्यामुळे मराठ्यांची अस्मिता जागृत झाली. त्यातून संताजी, धनाजीसारखे आघाडीचे सेनानी पुढे आले. त्यांनी जीवाची पर्वा न करता औरंगजेबाच्या तंबूचे कळस कापून आणण्याचे धाडस केले. म्हणूनच येसूबाईचा हा त्याग, आत्मयज्ञ इतिहासात अनन्यसाधारण महत्त्वाचा गणला जाणे अतिशय आवश्यक आहे. माणसातला एखादाच गुण असा अद्वितीय असावा की, त्यामुळे त्याच्या पूर्ण आयुष्याचे सोने व्हावे. त्याप्रमाणे येसूबाईचा रायगडावरील सल्ला इतका महत्त्वाचा आहे की, त्यामुळे तिला मराठ्यांच्या इतिहासात अढळ स्थान प्राप्त झाले आहे. तिथून तिला हलविण्याची ताकद कुठल्याही मानवी शक्तीत नाही.

**येसूबाईबद्दल गौरवोद्‌गार**

माणूस हा चांगल्या- वाईट गुणांचा पुतळा असतो. वाईटाची मोजदाद जास्त प्रमाणात झाली असेल तर त्याला वाईट आहे असे संबोधतो, दुर्गुणी समजतो. परंतु तीच चांगल्या गुणांची बेरीज अधिक झाल्यास त्या व्यक्तीला सद्‌गुणी म्हणतो. ऐतिहासिक व्यक्तींमध्ये इतिहासकारांनी कोणत्याही मान्यवर व्यक्तीलासुद्धा निखालस चांगले म्हटलेले आढळत नाही. पराक्रमी परंतु दुर्व्यसनी, कर्तबगार परंतु अभिलाषी अशा तऱ्हेने त्या व्यक्तीचे गुणदोष इतिहासात चर्चिले जातात.

येसूबाईबद्दलचा विचार करताना प्रामुख्याने एक गोष्ट नजरेसमोर येते ती म्हणजे तिच्या बाजूच्या काय परंतु विरोधी पक्षातील इतिहासकारांनीसुद्धा तिच्याबद्दल गौरवोद्‌गार काढलेले आहेत.

वा.सी. बेंद्रे आपल्या 'छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात म्हणतात, "वीरस्नुषा, वीरकन्या, वीरपत्नी व वीरमाता म्हणून येसूबाईचे कार्य, कर्तृत्व फार थोर आहे. सम्राट औरंगजेबानेही तिच्या कार्य - कर्तृत्वाचा गौरव करावा इतकी ती राजकारण कुशल स्त्री होऊन गेली."

वा.सी. बेंद्रे येसूबाईच्या कर्तृत्वाची वाखाणणी करीत असले तरी ती वीरपत्नी, वीरमाता या दृष्टिकोणातूनच. तिच्या वैयक्तिक गुणांचा परामर्षही पत्नी, माता अशा दुय्यम स्थानावरूनच घेतलेला दिसतो.

सेतुमाधवराव पगडी आपल्या 'हिंदवी स्वराज्य व मोगल' यात म्हणतात, ''येसूबाईच्या शहाणपणाच्या धोरणामुळेच संभाजीपुत्र शिवाजीस शाहू हे नाव देऊन त्याला सप्तहजारी मनसब दिली.'' म्हणजेच शाहूच्या कर्तृत्वातसुद्धा माता म्हणून येसूबाईचा वाटा फार मोठा आहे हे इतिहासकार मानतात.

सेतुमाधवराव पगडी तिच्या मुत्सद्देगिरीने, शहाणपणाने शाहूला औरंगजेबाकडे विशिष्ट दर्जा प्राप्त झाला हे मान्य करूनही तिच्या स्वतंत्र अस्तित्वाची दखल घेत नाहीत.

'छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ' यात सौ. पवार येसूबाईच्या गुणांचा गौरव करताना म्हणतात, ''येसूबाई शत्रूच्या छावणीतही स्वाभिमानी बाण्याने राहिल्या. स्वत्व व अस्मिता त्यांनी टाकली नाही. धर्म व आशावाद त्यांनी त्यागला नाही. धर्मनिष्ठेपासून त्या दूर गेल्या नाहीत. शिवप्रभूंची सून म्हणून त्यांच्या धैर्य, शौर्य व मुत्सद्देगिरीच्या परंपरेस त्या जागल्या.''

सौ. पवार तर सरळ सरळ तिचा गौरव शिवप्रभूची सून म्हणूनच करतात.

सौ. कमल गोखले आपल्या ' शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात म्हणतात, ''येसूबाईने तिच्यावर आलेल्या संकटांना धैर्याने तोंड दिले, भोसले घराण्याची सून शोभेल अशीच शेवटपर्यंत वर्तणूक ठेवली. संभाजीच्या सहवासात असताना येसूबाईचे सहकार्य संभाजी राजांना दिले. संभाजी राजांनी अखेर मृत्यूला सामोरे जाताना जे धीरोदात्त वर्तन केले तसेच धैर्य तिने रायगड सोडताना दाखविले. संभाजी व येसूबाई ही जोडी आपल्या धैर्याने, कर्तृत्वाने, कणखर बाण्याने मराठ्यांच्या, भारताच्या इतिहासात अजरामर झालेली आहे.''

सौ. कमल गोखले आपल्या ग्रंथात संभाजीच्या कर्तृत्वाची वाखाणणी करतात. परंतु त्याच्यामागे त्याच्या सर्व अवगुणांसह आपला मानून त्याला त्याचे कर्तृत्व मराठ्यांच्या राज्याकरता खर्ची घालण्याला प्रवृत्त करणाऱ्या या स्त्री शक्तीचा उल्लेख फक्त एकदोन ओळींत करून स्तब्ध राहतात. तिच्यावर

आलेल्या संकटांना तिने धैर्याने तोंड दिले असे गोखले म्हणतात. परंतु ही संकटे आणण्याला कारणीभूत असलेल्या संभाजीची फक्त पत्नी म्हणूनच येसूबाईचा उल्लेख करतात. ही गोष्ट मनाला खटकल्याशिवाय राहात नाही.

'मराठ्यांचा इतिहास' या पुस्तकात अ.रा. कुलकर्णी व ग.ह.खरे म्हणतात, ''छत्रपती संभाजी व राणी येसूबाई यांनी राजकुमार राजाराम यास ममतेने व प्रेमळपणाने वागविले............... छत्रपती संभाजीच्या मृत्यूनंतर राणी येसूबाई व इतर मुत्सद्दी यांनी राजारामाला २२ फेब्रु १६८९ रोजी छत्रपतिपद दिले.'' स्वत:चा मुलगा राज्याचा अधिकारी असतानासुद्धा आपल्या दिरास छत्रपतिपद देणारी इतिहासात येसूबाई ही एकमेव स्त्री असावी.

'मागोवा' मध्ये नरहर कुरुंदकर तर सरळ म्हणतात, ''येसूबाईचे वजन संभाजीवर दांडगे होते. कलुषाच्या आहारी गेलेला संभाजी पत्नीच्या आहारी होता.'' अर्थात यामुळेच संभाजीसारख्या अविवेकी पुरुषाला ती विवेकाकडे वळवू शकली हे मान्य करतात.

'मराठी रियासत उग्रप्रकृती संभाजी' यात सरदेसाई येसूबाई संभाजी यांच्या प्रेमाचे वर्णन करताना सांगतात, ''संभाजीसारखे आवेशी पुरुष जितके क्रोधाविष्ट असतात, तितकेच ते प्रेमवशही असतात.'' ''येसूबाईशिवाय अन्य विवाहित स्त्री संभाजीला नसावी.'' असेही सरदेसाई म्हणतात. म्हणजे यावरून येसूबाईने आपल्या प्रेमळ स्वभावाने संभाजीसारख्या व्यसनी व आततायी पुरुषाला योग्य मार्गावर आणण्याचा प्रयत्न केला होता असे दिसते.

'भारत वर्ष मासिक' यात 'छत्रपती संभाजी महाराजांच्या पश्चात मराठ्यांची स्थिती,' या राजवाडे संपादित ग्रंथात येसूबाईबद्दल गौरवोद्‌गार काढले आहेत. ''हिंदुशाही यवनांच्या सपाट्यातून वाचविण्याकरता तिने दृढनिश्चय केला होता.''

'भारतवर्ष' या राजवाडे संपादित ग्रंथात परखडपणे येसूबाईच्या हिंदु-स्वराज्याच्या कल्पनेचा उदो उदो केलेला आहे.

'असे होते मोगल' या मनुची निकोलाय याच्या अनुवादित ग्रंथात ज.स.चौबळ म्हणतात, ''मोगलांना २२ किल्ल्यांच्या सोडचिठ्ठ्या तिने मोठ्या

मुत्सद्देगिरीने दिल्या कारण हे गड घेईपर्यंत मोगलांना दम पुरणार नाही याची तिला जाणीव होती.''

ज.स. चौबळ मनुची निकोलायच्या ग्रंथाचा अनुवाद करताना मनुचीच्या दृष्टोत्पत्तीस न आलेल्या येसूबाईच्या मुत्सद्देगिरीची वाखाणणी करतात.

'हुतात्मा संभाजी' यात शंकरराव सावंत म्हणतात, ''येसूबाई ही अत्यंत सात्त्विक वृत्तीची पतीपरायण व पुण्यशील बाई होती. औरंगजेबाच्या कैदेत असतानाही तिने आपल्या चारित्र्याचा प्रभाव औरंगजेब व त्याची मुलगी झिनतुन्निसा हिच्यावर पाडला होता.''

शंकरराव सावंत यांना तिच्यातील सात्त्विक वृत्ती, पतिपरायणता दिसली. त्यांनी तिच्या मुत्सद्देगिरीची दखलच घेतलेली नाही.

येसूबाईच्या मुत्सद्देगिरीचे वर्णन करताना तिने संतापी संभाजीला क्रूरतेने वागण्यापासून परावृत्त केले त्याबद्दल ' The Rise and Fall of Maratha Power' यात शि.ल. करंदीकर म्हणतात,

"The tragedy was however not enacted at this time, the credit must be given to Yesubai."

रायगड सोडण्याबद्दल राजारामाला सांगितले व दोन्ही राज्यांचे वारस एकत्र सापडू नयेत याबद्दलही करंदीकर म्हणतात, ''तिने कलुषाला हिडीस अनुष्ठाने राजधानीत (रायगडावर) करण्यास बंदी केली होती.''

शि.ल. करंदीकर मात्र स्पष्टपणे येसूबाईमुळेच शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर घडून येणाऱ्या दुर्घटना टळल्या हे ठासून सांगतात.

History of Marathas यामध्ये Grant Duff राजारामाशी येसूबाईचे संबंध कसे होते सांगताना म्हणतो :

"Rajaram lived on terms of friendship with Yesubai, the legitimate wife of Sambhajee, who with her son Shivajee resided in Raigarh." Yesubai was a woman of much prudence and carefully avoided intrigues."

ग्रँट डफ आपल्या ग्रंथात येसूबाईने राजारामाला आपल्या बाजूला वळवून घेऊन पुढे येणाऱ्या कटू घटना टाळून मराठी राज्याच्या उभारणीकरता कसे प्रयत्न केले याचे वर्णन करतो.

या सगळ्या इतिहासकारांच्या लिहिण्याचा विचार केला असता एक गोष्ट स्पष्ट होते की येसूबाई महत्त्वाकांक्षी होती. परंतु राक्षसी नव्हे, मुत्सद्दी होती. परंतु त्याचा उपयोग तिने स्वराज्याला बळकटी आणण्याकरता केला. तिच्या चारित्र्याबद्दल, प्रेमळ व समंजस वागणुकीबद्दल सगळ्याच इतिहासकारांनी तिला गौरविले आहे.

येसूबाईच्या अनेक गुणांचे वर्णन इतिहासकारांनी वेगवेगळ्या तऱ्हेने परंतु अलग अलग असे केले आहे. सर्व गुणांचा समुच्चय करून एकत्रित असे तिच्या कार्याचे समालोचन विस्तृतपणे कुणीही केलेले नाही. ते काम आपल्या अल्पमतीप्रमाणे लेखिकेने करण्याचा प्रयत्न या प्रबंधात केला आहे.



: ८ :

# साधन चिकित्सा

## महाराणी येसूबाईच्या इतिहासाची साधने

**प्राथमिक साधने-**

येसूबाई संबंधीची अनेक पत्रे उपलब्ध असूनसुद्धा त्यांचे एकत्रीकरण करण्यात आलेले नाही. उपलब्ध साधनांवरून तिच्या व्यक्तिमत्त्वावर प्रकाश पडतो. ती प्राथमिक साधने खालीलप्रमाणे:-

**पाचाड येथे राजमंदिर बांधण्यासंबंधीचे पत्र-**

येसूबाई व संभाजी यांनी अरजोजी जाधव यास या पत्राद्वारे पाचवड येथील प्रासाद पाहून संतोष वाटल्यामुळे बक्षिसी दिली. इमारतीच्या लोकांस ३,००० व अररोजी यादव या स्थापती ५,००० होन दिले. या सुविध पतीपत्नींना वास्तुकलेसंबंधी आत्यंतिक आवड होती हे या पत्रावरून स्पष्ट होते.(१)

**दुर्गाबाईच्या सुटकेसंबंधी गिरजोजी यादवास संभाजीचे पत्र-**

ताराबाईकालीन कागदपत्रे खंड १ ला यात या पत्राचा उल्लेख आहे. यामध्ये दुर्गाबाईला कैदेतून सोडविण्याकरता संभाजीने दिलेले पत्र घेऊन गिरजोजी यादव दुर्गाबाईस भेटला होता. परत आल्यावर त्याने संभाजी व येसूबाईस त्यासंबंधी माहिती दिली. दुर्गाबाईला सोडविण्यात गिरजोजीस यश आले नाही. अखेर तिचे काय झाले हे अज्ञात आहे. दुर्गाबाई येसूबाईबरोबर दक्षिणेत आल्याचा उल्लेख नंतर सापडतो. दुर्गाबाईला सोडवून आणण्याच्या कामात येसूबाईचाही सहभाग होता, हे या पत्रावरून स्पष्ट होते.(२)

**तुळजापूरच्या देवीस वार्षिक नेमणूक करून दिल्याचे आद्यंत संस्कृत पत्र-**

या पत्रात संभाजीने भोसले घराण्याचा इतिहास दिलेला आहे. हे पत्र संस्कृत भाषेत आहे. यावरून संभाजी व येसूबाई यांची संस्कृत विषयी आवड व त्यांची योग्यता स्पष्ट होते. यांत शेवटी पत्रांतर्गत व्यक्तिमुद्रा यात संभाजीच्या दोन मुद्रा, येसूबाईची मुद्रा, मोरेश्वर पंडितराय यांची मुद्रा अशा तिघांच्या मुद्रा

दिल्या आहेत. यावरून येसूबाईचा राज्यकारभारातील सहभाग प्रामुख्याने जाणवतो.(३)

**चाफळ यात्रेसंबंधी दिवाकर गोसावी यांना येसूबाईने लिहिलेले पत्र-**

या पत्रात संभाजीच्या कारकिर्दीत युद्धाच्या हालचालीत मग्न असताना राज्यांतर्गत कारभार येसूबाईवर सोपविण्यात आलेला होता. लष्कराचा उपद्रव जनतेला होऊ नये म्हणून येसूबाई काळजी घेत होती. सैन्याकडून चाफळच्या यात्रेला कोणताही त्रास होऊ नये; ती सुखरूप पार पडावी म्हणून येसूबाईने दिवाकर गोसावी यास हे अभयपत्र दिलेले आहे. या पत्रात येसूबाईला सही शिक्क्यानिशी राज्यकारभाराचा मिळालेला अधिकार ती किती दक्षतेने पाळत असे हे दिसून येते. हे पत्र अस्सल मोडीमध्ये आहे. यावरून मोडीलिपी बद्दलचे ज्ञान येसूबाईला किती होते याची कल्पना येते.(४)

**औरंगजेबाच्या कैदेत असताना येसूबाईने राजारामास पाठवलेले पत्र-**

या पत्रात मोठ्या संयमाने येसूबाईने आपली परिस्थिती राजारामास कळविली आहे व त्याच्या कुटुंबास चंद्र प्रान्ती घेऊन जावे असे कळवले आहे. तसेच राजारामास पुत्र झाल्याबद्दल अभिनंदन केले आहे. राजचिन्हे बाळगून पूर्वीच्या चालीप्रमाणे सर्व राज्यव्यवहार करण्याची सूचना ती राजारामास देते. यामुळे अर्थात राजाराम व येसूबाई यांचे वितुष्ट आहे; या संभ्रमात ती औरंगजेबास ठेवते. यावरून तिची मुत्सद्देगिरी दिसून येते.(५)

**चिंचवडच्या मोरया गोसावी यांना येसूबाईने लिहिलेले पत्र-**

हे पत्र येसूबाईने अहमदनगरच्या किल्ल्यात कैदेत असताना श्री देव चिंचवड यांस लिहिलेले आहे. येसूबाईची स्थिती त्यावेळी अत्यंत हलाखीची होती. संकटाचा परिहार व्हावा म्हणून या पत्राद्वारे चिंचवडकर देवांकडे ती धाव घेते. हे पत्र म्हणजे उत्तम मराठी साहित्याचा नमुना मानला जातो.(६)

**गोविंद गोपाळ दगोजी मंगोजी यांना शाहूने लिहिलेले पत्र-**

या पत्रात वढू बुद्रुक येथे संभाजीचा मृत देह टाकण्यात आला होता. त्याठिकाणी येसूबाईने नजरकैदेत असताना वृंदावन बांधण्याची आज्ञा केली होती. त्या वृंदावनाची पूजा - अर्चा नित्य चालू राहण्यासंबंधी या पत्रात लिहिलेले आहे.(७)

**येसूबाईच्या सुटकेसंबंधी यादवराव मुन्शी यांना शाहूने पाठवलेले पत्र-**

या पत्रात शाहूने मातोश्री येसूबाई व मदनसिंग यांचे आगमन दक्षिणेत व्हावे अशी इच्छा व्यक्त केली आहे व मातोश्री व चिरंजीवांविषयी वारंवार कळविण्याचे सांगितले आहे. यावरून येसूबाई दक्षिणेत येण्यासंबंधी शाहू किती उत्सुक होता हे कळले व ती दक्षिणेत आली हे ही नक्की होते.(८)

**येसूबाईच्या सुटकेसंबंधी बाळाजी विश्वनाथास शाहूचे पत्र-**

उत्तरेकडे जाऊन कोणती कामे करावयाची यासंबंधी बाळाजी विश्वनाथ यांस जी कलमे दिली होती, त्यात एका कलमात मातोश्री येसूबाई, मदनसिंग व इतरांना बादशहाकडून मागून घेणे असे शाहूने म्हटले आहे. यावरून शाहूचे आपल्या मातेवर किती प्रेम होते हे दिसून येते व तिच्या सुटकेसंबंधी तो किती तत्पर होता हेही दिसून येते.(९)

**वर्षासनाबद्दल येसूबाईने दिलेले पत्र-**

हे पत्र कै. मल्हार खंडेराव चिटणीस यांचेकडे असलेल्या बोरगाव दप्तरातील आहे. या पत्रावरून येसूबाईने इ.स. १७२० मध्ये रघुनाथ भट व शंकर भट या कऱ्हाडे ब्राह्मणांना 'पृथ्वी प्रदक्षिणा' करून आल्याबद्दल दिलेल्या वर्षासनाचा उल्लेख आहे. याचा अर्थ ती दक्षिणेत परत आली होती हे सिद्ध होते.(१०)

**संभाजी (कोल्हापूर) चे शाहूस पत्र-**

या पत्रात येसूबाई दक्षिणेत आल्याबद्दल संभाजी संतोष व्यक्त करतो.(११)

**संभाजीचे (कोल्हापूर) शाहूस सांत्वनपर पत्र-**

या पत्रावरून येसूबाईचा मृत्यू १७३० नंतर झाला असावा असे कळते. या पत्रात तारीख नसल्यामुळे तिच्या मृत्यूचा निश्चित दिवस कळू शकत नाही. या पत्रात संभाजीने (कोल्हापूर) शाहूचे सांत्वन केले आहे. तसेच येसूबाईसंबंधी संभाजीचा आदरही व्यक्त होतो. १७३० नंतर शाहू व संभाजी यांच्यात सख्यत्व निर्माण झाले होते.

ही सर्व पत्रे येसूबाईच्या इतिहासासंबंधी आपल्या दृष्टीने महत्वाची आहेत. 'जेधे शकावली' यातील तपशील महत्त्वाचा आहे. इ.स. १६१० ते १६९७ या काळातील महत्त्वाचे घटनावार उल्लेख आहेत. हा मजकूर चिटणीस बखरीतील मजकुराशी जुळता आहे.

संभाजीला परळीस जाण्याची आज्ञा दिल्याचाही उल्लेख शकावलीत आहे. संभाजीकालीन पत्र व्यवहार हा शकावल्यांवरूनच तयार केला आहे. शिवराज्याभिषेकाच्या वेळी संभाजीला युवराज पदाचा शास्त्रोक्त विधी करण्यात आल्याची नोंद शकावलीसारख्या प्रमुख साधनांत आढळत नाही.

**प्राथमिक साधने संदर्भ सूची-**


१. पवार अप्पासाहेब (संपा.), ताराबाईकालीन कागदपत्रे.
खंड १ पृ. ४८४-५४८

२. पवार अप्पासाहेब (संपा.) ताराबाईकालीन कागदपत्रे.
पत्र क्र. ३२२

३. जोशी, आं.बा. / शिवशाहीचा लेखनालंकार - चांदोरकर आबा

४. रामदास रामदासी, श्री समर्थ संप्रदायाची कागदपत्रे, भाग ९ ते ६७

५. गोगटे, चि.गं. छत्रपती थोरले शाहू महाराजांचे चरित्र.

६. आपटे द.वि. इतिहास मंजिरी निवडक ऐतिहासिक उतारे, पृ. १३३

७. बेंद्रे, वा.सी., छत्रपती संभाजी पृ. ६२०

८. आपटे, द.वि. (संपा) इतिहास मंजिरी निवडक ऐतिहासिक शं.न. जोशी
उतारे, गुप्ते दप्तर, पृ. १७४

९. सरदेसाई काळे/ कुलकर्णी (संपा) ऐतिहासिक पत्र व्यवहार

१०. कै. चिटणीस मल्हार खंडेराव इतिहास संग्रह
बोरगाव दप्तर. पेशवे दप्तर

११. सरदेसाई गो.स. मराठी रियासत, मध्यविभाग प्रथम आ. पृ. १०३-४.

१२. सरदेसाई गो.स., मराठा रियासत

प्राथमिक साधने म्हणून आपणास उपयोगी पडतात. या पत्रांवरून येसूबाईचे व्यक्तिमत्त्व, तिचा राजकारणातील सहभाग, राजकीय व सामाजिक विषयासंबंधी तिची जागृती, कौटुंबिक काळजी इ. विषयी आपणास कल्पना येते.

**दुय्यम साधने -**

मध्ययुगाच्या इतिहासाचा मागोवा घेताना बखरींचा आधार घेणे आवश्यक ठरते. दुय्यम साधनांमध्ये बखरींना महत्त्व प्राप्त झाले आहे. कारण या काळातील इतिहास हा सविस्तर रीतीने लिहून काढलेला दिसत नाही. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर राज्यात निर्माण झालेली अराजक सदृश परिस्थिती याला काही अंशी कारणीभूत आहे. त्यामुळे बखरी या बहुतांश ऐकीव पुराव्यावर लिहिल्या गेल्या आहेत. त्यात अस्सलपणाबरोबरच थोड्या फार प्रमाणात ऐकीव गप्पा, दंतकथा किंवा भावनोत्कटता काही प्रमाणात आलेली आहे. मात्र यातील काही घटना या इतिहास समजून घेण्याच्या दृष्टीने आवश्यक ठरतात.

सभासद बखर-

ही बखर इ.स. १६९४-९७ च्या दरम्यान लिहिली गेली. शिवाजी महाराजांच्या राजकारणाचा प्रत्यक्ष अनुभव कृष्णाजी अनंत सभासद यांना असल्यामुळे राजारामाच्या आज्ञेवरून त्याने ही बखर लिहिण्यास प्रारंभ केला. प्रत्यक्ष घडलेल्या घटना लेखकाने पाहिल्या असल्यामुळे ही बखर मोठ्या प्रमाणात विश्वसनीय मानण्यात येते.

सभासदांनी आपल्या बखरीत असे म्हटले आहे की, संभाजी हा "व्यसनाधीन होता. त्याने आपल्या कैफाच्या भरात ब्रह्म हत्या केली, खजिना उडविला व शेवटी राज्याला दगा दिला." (संपा, काणे)

वाकसकर संपादित बखरीत असे स्पष्ट म्हटले आहे की, येसूबाईशिवाय अन्य दुसरी विवाहित स्त्री संभाजीस नव्हती.

सभासद बखरीतील मजकूर शिवाजी महाराजांनी आपल्या अंतकाली उच्चारलेल्या शब्दावरून त्यांनी वारसाहक्काचा प्रश्न अष्टप्रधानांच्या हाती सोपवलेला होता असे दर्शवितो. सभासद बखरीमधून येसूबाईसंबंधीची अधिक माहिती मिळत नसली तरी पुढील इतिहास समजण्यासाठी सभासद बखरीचे महत्त्व अधिक आहे.(१)

**चिटणीस बखर-**

ते मल्हार रामराव चिटणीस (संपादक भीमराव कुलकर्णी) मराठी बखर वाङ्मयात म.रा. चिटणीस यांच्या नावाला विशेष महत्त्व आहे. त्यांच्या नावावर शिवाजी महाराजांचे सप्त प्रकरणात्मक चरित्र, संभाजी व राजाराम यांची चरित्रे या बखरीत नमूद आहेत.

खंडो बल्लाळ व गोविंद खंडेराव यांच्या टिपणांचा आधार बखरींना घेतलेला आहे. काही ठिकाणची मांडणी ही नाट्यपूर्ण वाटते. घटनाक्रम दुर्लक्षित आहे. रायगड काबीज केल्यानंतर येसूबाई व शाहू यांच्यासह सर्व कागदपत्रे सापडत नाहीत असे चिटणीस म्हणतात. नावांचा अनेक ठिकाणी घोटाळा झालेला आहे. शंकराजी नारायणाऐवजी नारो शंकर असे लिहिलेले आढळते. चिटणीसांच्या बखरीचा निर्वाळा बहुतेक सर्व संशोधकांनी दिलेला आहे. ''शिक्के शिवाजी महाराज जिजाबाई साहेब यांजकडे ठेवून करवीत होते. त्याप्रमाणे संभाजी महाराजांनी .............. येसूबाई साहेब याजकडून करवू लागले.''

महाराजांच्या मृत्यूनंतर क्रोधाविष्ट झालेल्या संभाजीने विरुद्ध पक्षाविरुद्ध मोहीम सुरू केली. त्यावेळी बाळाजी आवजी यांचा वध केल्यानंतर येसूबाईने संभाजीची कानउघाडणी करून ते कृत्य थांबविले.

''बाळाजी प्रभु मारिले हे उचित न केले.............. एकेक होते तेही तैसे गेले पुढे राज्य कसे चालेल'' अशा शब्दात संभाजीस दोष देऊन तिने बाळाजीची दोन मुले खंडो व निळो बल्लाळ यांचा स्वत: सांभाळ केला. येसूबाई-संभाजी यांच्या विवाहाचे वर्णन चिटणीसांनी आपल्या बखरीत केले आहे.

शृंगारपुरी तांत्रिक अधिष्ठान संभाजीने करवून घेतले. तो कलुषाच्या अधीन झाला होता. तसेच दक्षिणेत संभाजीस स्वत:ची संघटना उभी करता आली नाही. औरंगजेबपुत्र अकबर शरण आला. या संधीचा फायदा त्याला घेता आला नाही. या गोष्टी चिटणीसांनी वर्णन केल्याप्रमाणे असाव्यात.

संभाजी नंतरच्या काळात राजाराम व येसूबाई यांचे भावनिक नाते चिटणीसांनी वर्णन केले आहे. ते महत्त्वाचे आहे. येसूबाईचे अनेक ठिकाणी

राज्यासंबंधाचे जे उद्‌गार चिटणीसांनी दिलेले आहेत त्यावरून तिच्या निर्धाराची स्पष्ट कल्पना येते.

राजारामाने राज्यारोहण नाही पण मंचकारोहण केले. कारण तो संभाजीच्या मुलाला- शाहूला वारस समजत होता. असेही चिटणीसांनी म्हटले आहे. राजाराम आपल्याला येसूबाईने दिलेले प्रतिनिधिपद हे राज्यपद नव्हे असे समजत होता.(२)

शिवाजी महाराजांच्या सप्त प्रकरणात्मक चरित्रात संभाजी- येसूबाई यांच्या विवाहाची माहिती चिटणीसांनी दिलेली आहे.

**दिग्विजय बखर-**

या बखरीत काशीपंत व विसाजीपंत यांच्या जवळ मथुरेत संभाजीला ठेवले होते याबद्दलचे वर्णन आहे. संभाजीच्या मृत्यूची अफवा पसरविण्यात आली होती. त्याचा परिणाम अर्थात येसूबाईवर मोठ्या प्रमाणात झालेला होता. सोयराबाईने विषप्रयोग केला म्हणून शिवाजी महाराज निधन पावले असा उल्लेख यात आहे. परंतु पुढे सोयराबाईला मात्र संभाजीच्या क्रोधापासून बचावण्याचे काम येसूबाईने केले.(३)

**श्रीमंत महाराज भोसले यांची बखर-**

''रायरीच्या बखरीत (इंग्रजी भाषांतर) मरणापूर्वी शिवाजी महाराजांनी एक अधिकृत आज्ञापत्र प्रधानांसाठी मागे ठेवले होते.'' याचाच उल्लेख शेडगावकर बखरीत केला आहे.(४)

**मराठ्यांची बखर - ग्रँट डफ**

यामध्ये राजाराम व येसूबाई या दोघांची जवळची मैत्री असा उल्लेख आहे. येसूबाई व शाहू यांची औरंगजेबाच्या मुलीशी मैत्री होती. औरंगजेबसुद्धा शाहूला प्रेमाने 'साहू' म्हणत असे. १६८९ मध्ये रायगड घेतल्यानंतर मोगलांनी येसूबाई व शाहू यांना राजबंदी म्हणून ठेवले होते. हा उल्लेख खरा असला तरी शिवाजी महाराजांची पत्नी सोयराबाई शिर्के यांची कन्या असा तिचा चुकीचा उल्लेख या बखरीत आलेला आहे.(५)

**बखरी-**

बखरींमधून मराठ्यांच्या राजकारणाचे वेधक दर्शन आपणास घडते. शिवकालीन मराठ्यांचे राजकारण, गनिमी काव्यासारख्या युद्धपद्धती, देशरक्षणासाठी झपाटलेली माणसे या सर्वांचा ठसा बखरीमध्ये उमटलेला आहे. तसेच वतनाकरता प्रसंगी राज्यालाही विघातक ठरणारी माणसे, त्याचा मोगलांनी घेतलेला फायदा या सगळ्यांचे चित्रण या बखरीत आढळते. इंग्रज इतिहासकार स्कॉट वेअरींग हा मराठी बखरींना इतर तत्कालीन इतिहासकारांच्या मानाने झुकते माप देतो. मध्ययुगीन अज्ञात इतिहासावर बखरींनी बराच प्रकाश टाकलेला आहे. बखरी या समकालीन व्यक्तींनी लिहिलेल्या असल्यामुळे जास्त विश्वासार्ह आहेत. त्यात काही घटनांचे वर्णन भावनोत्कट आणि अतिशयोक्त असले तरी मूळ घटना या विश्वसनीय आहेत. बखरींमधून येसूबाईची माहिती त्रोटक आणि विखुरलेली मिळत असली तरी एक महत्त्वाचे दुय्यम साधन म्हणून बखरींचा संदर्भ घेणे आवश्यक आहे.

## वाङ्मयीन साधने

**संस्कृत साधने-**

शिवभारत या परमानंद व त्याचा मुलगा गोविंद यांच्या काव्यामध्ये संभाजीबद्दलची बरीचशी माहिती दिलेली आहे. श्री शेजवलकर म्हणतात, ''हे काव्य म्हणजे केवळ संभाजीची स्तुती करण्याकरता लिहिलेले आहे. यातील बरीचशी पाने परमानंद पुत्र गोविंद याने लिहिली आहेत. या काव्यात संभाजी व येसूबाई यांनी पुत्रकामेष्टी यज्ञ केला व त्यामुळे त्यांना पुत्र झाला असे म्हटले जाते. शाहूच्या जन्माचे रामजन्माप्रमाणे पूर्वाख्यान रचून त्याने स्वतःला कवींद्र म्हटले आहे असे शेजवलकर म्हणतात. संभाजीचे गुण वर्णन करण्याकरता देवदत्ताने (गोविंद) शिवाजीच्या सर्व मंत्र्यांची नालस्ती केलेली आहे.(६)

## फार्सी ग्रंथ

**तारीखे खाफीखान-**

या ग्रंथातील शिवाजी महाराजांसंबंधीचा भाग ग.ह. खरे यांनी प्रसिद्ध केला आहे. तसेच वा.सी. बेंद्रे यांनी संभाजी बद्दलचा भाग अनुवादित केला

आहे. सेतु माधवराव पगडी यांनी १६८० ते १७०७ या कालखंडाचा अनुवाद केलेला आहे.

शिवाजी महाराज आग्र्याहून परत आले असताना संभाजीच्या मृत्यूची अफवा पसरविण्यात आली होती. खाफीखान म्हणतो, संभाजीच्या पत्नीने अतिशय शोकाने सती जावे असे इच्छिले पण मोठ्या मिनतवारीने तिला परावृत्त करण्यात आले.(७)

**शकावल्या-**

पाश्चात्त्यांप्रमाणे मराठी माणसांत दैनंदिन हकिकती लिहून ठेवण्याची पद्धत नव्हती. शकावल्यात मुसलमानी अकबरीप्रमाणे दैनंदिन माहिती काही प्रमाणात लिहून ठेवली गेली आहे. शकावल्या इतिहासाच्या दृष्टीने अस्सल व पहिल्या दर्जाचे साधन म्हणून समजल्या जातात. साधारणतः शिवकालीन शकावल्या या समकालीन कागदपत्रावरून तयार केल्या आहेत.

**दुय्यम साधने संदर्भ सूची-**


१. काणे (संपा), सभासद बखर.
वाकसकर (संपा), छत्रपती शिवप्रभूचे चरित्र,
पृ. १२७

२. कुलकर्णी भीमराव, मल्हार रामराव चिटणीस विरचित श्रीमन्महाराज संभाजी राजे आणि थोरले राजाराम यांची चरित्रे. सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे-नागपूर, १९८३ द्वितीय आवृत्ती, पृ. २४५-८.१२

३. दांडेकर ल.का., नंदुरबार पा.रा. (संपा), दिग्विजय बखर.

४. भावे वि.ल. (संपा.) शेडगावकर बखर.

५. ग्रँट डफ, हिस्ट्री ऑफ मराठाज, पृ. २७८

६. दिवेकर, ह.रा. आपटे द.वि. (संपा.) शिवभारत.

७. एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगाल (संपा.)
तारीखे खाफीखान, १८७४.

८. भावे वा.कृ. जेधे शकावली,
शिवराज्य व शिवकाल, पृ. ६४.

# संदर्भ ग्रंथ सूची


| | |
|---|---|
| १. आपटे, द.वि. | मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, १९३४. |
| २. --------- | शिवाजी निबंधावली, खंड १,२,३ श्री शिवचरित्र कार्यालय, पुणे. |
| ३. आपटे, द.वि. ओतुरकर, रा.वि.(संपा) | महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास. |
| ४. आपटे द.वि. (संपा) | श्री शिवभारत कवींद्र परमानंदकृत, (संस्कृत), १९२७ |
| ५. ------------ | महाराष्ट्र इतिहास मंजरी अथवा निवडक ऐतिहासिक उतारे, पूर्वार्ध. |
| ६. आपटे, द.वि. दिवेकर, स.म. (संपा) | शिवचरित्र प्रदीप |
| ७. अमात्य, रा.नि. | आज्ञापत्र (अर्थात शिवाजी महाराजांची राजनीती) |
| ८. ओतुरकर, रा.वि. जोशी, शं.ना. (संपा) | दत्तोपंत आपटे लेखसंग्रह, १९४५ |
| ९. ओतुरकर, रा.वि. आपटे, द.वि. (संपा.) | महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास, भा.इ. सं. मं., पुणे |
| १०. आपटे, कै. द.वि. | ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड ५, भा.इ. सं.मं., पुणे |
| ११. कुलकर्णी अ.रा. खरे., ग.ह. | मराठ्यांचा इतिहास |
| १२. काळे द.वि. | छत्रपती शिवाजी महाराज |
| १३. काटे, रा.गो. | राज्यव्यवहार कोश, |
| १४. कुरुंदकर नरहर | मागोवा. |
| १५. कुंटे, ग.ग. | बहामनी राज्याचा इतिहास, अनुवादक बुरहाते मासीर, १९६६. |
| १६. खरे, ग.ह. जोशी, शं.ना. | शिवचरित्र साहित्य, खंड ३. भा.इ.सं.म, पुणे. |

| | |
|---|---|
| १७. खरे ग.ह. | महाराष्ट्राची चार दैवते, १९५८. |
| १८. ----------- | महाराष्ट्र महोदयाचा पूर्वरंग |
| १९.------------(संपा.) | ऐतिहासक फारसी साहित्य, खंड १-४ |
| २०. ----------- | दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने |
| २१. गोगटे चि.ग. | छत्रपती थोरले शाहू महाराज यांचे चरित्र |
| २२. गर्गे स.मा. राणे गो.य. (सं.पा.) | करवीर रियासत |
| २३. गोखले, वां.दा. | गृहांगना- वीर पत्नी (भगिनी मु. १९४३) |
| २४. गोखले कमल | शिवपुत्र संभाजी, १९७१ |
| २५. अ. नंदा नंदूरबारकर, दांडेकर | शिव दिग्विजय बखर. |
| ब. गुजर, मा. वि. | करवीर घराण्याच्या इतिहासाची साधने |
| २६. चित्राव सिद्धेश्वर शास्त्री | मध्ययुगीन चरित कोष. |
| २७. चौबळ, ज.स. | असे होते मोगल. |
| २८. चिटणीस म.रा.व खोत, च.ना. (संपा.) | छत्रपती संभाजी महाराजांची बखर. |
| २९. चिटणीस गो.खं. | छत्रपती शाहू महाराजांची बखर. |
| ३०. चिटणीस म.रा | शककर्ते श्री शिव छत्रपती महाराज नांवे सप्त प्रकरणात्मक चरित्रं. |
| ३१. चाफेकर आ.बा. जोशी, आ.बा. (संपा.) | शिवशाहीचा लेखनालंकार |
| ३२. जोगळेकर, चि.ग. | छत्रपती थोरले शाहू महाराज यांचे चरित्र |
| ३३. जोशी, रा.न. (संग्रह) | रामदास रामदासी संभाजीकालीन सार-संग्रह |
| ३४. जोशी शंकरराव सत्कार समिती | मराठेकालीन समाजदर्शन, १९६०. |
| ३५. पगडी सेतुमाधवराव | शिव चरित्रः एक अभ्यास. |
| ३६. ------------ | हिंदवी स्वराज्य व मोगल, १९६६ |
| ३७. ------------ | मराठे व औरंगजेब अनुवाद मासिरे |

अलमगिरी
३८. ------------ महाराष्ट्र आणि मराठे.
३९. ------------ मराठे आणि मोगल.
४०. पवार जयसिंगराव छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ
४१. पुरंदरे, ब.मो. राजा शिवछत्रपती
४२. पारसनीस,द.ब. इतिहास संग्रह, १९०८-१६
४३. ------------ भोसल्यांचे कुलाचार, १९१५.
४४. पारसनीस द.ब. आणि मावजी पु.वि. (संपा.) सनदापत्रातील माहिती, १९१३.
४५. पिसुर्लेकर प्रा.पा. पोर्तुगीज मराठे संबंध, १९६७.
४६. पोतदार म.म.द.वा. श्री शिवचरित्राचे पैलू.
४७. पुराणेतिहास प्रकाशक मंडळी, बडोदा. श्री शिवाजी प्रताप, १८९५
४८. पेशवे दप्तर अीद रोजकीर्दी रु.नं. १, पुडके नं.१५, क्र. १९, रोजकीर्द सु । आबी आइशि नं. मयाअलफ
४९. पवार जयसिंगराव ताराबाईकालीन कागदपत्रे.
५०. बेंद्रे वा.सी. छत्रपती संभाजी महाराज यांचे चरित्र, १९६०
५१. ------------- मालोजी राजे आणि शहाजी महाराज यांची चिकित्सक चरित्रे, १९६७.
५२. ------------- श्री शिवाजी महाराज यांचे विचित्सक चरित्र( पूर्वार्ध, उत्तरार्ध), १९७२.
५३. मोडक, ज.ब.(संपा.) मराठी साम्राज्याची बखर काव्येतिहास संग्रह
५४. ताटके अरविंद शिवपत्र संभाजी
५५. देसाई, स.शं. (अनु.) पोर्तुगीज दप्तर, मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड १ ते १६

| | |
|---|---|
| **५६. देविप्रसाद** | औरंगजेब नामा (हिंदी) |
| **५७. दळवी, गो.बा.** | मराठी कुळांचा इतिहास, १९९२. |
| **५८. दांडेकर ल.का.** | शिव दिग्विजय |
| **नंदुरबारकर पा.रा. (संपा.)** | (श्री शिवाजी महाराजांची बखर) शके १८१७. |
| ५९. देव रा.श्री. (संपा.) | रामदास रामदासी ग्रंथावली, भा.३, जेधे देशमुख, भा. ९ |
| ६०. वाकसकर, वि.स.(संपा.) | सभासद बखर, छत्रपती श्री शिव प्रभूचे चरित्र. |
| ६१. ----------- | शिव छत्रपतीची ९१ कलमी बखर. |
| ६२. शेजवलकर त्र्यं. श. | कोकणच्या इतिहासाची पार्श्वभूमी, १९६१ |
| ६३. ----------- | श्री शिव छत्रपती, १९६४. |
| ६४. शकावल्या. | मराठी शिवचरित्र प्रदीप, जेधे शकावली |
| ६५. शिवापूर दप्तरातील शकावली | सहा कलमी शकावली. |
| ६६. सावंत शंकरराव | हुतात्मा संभाजी |
| ६७. सरदेसाई गो.सं. व काळे कृ.पां. (संपा.) | ऐतिहासिक पत्रव्यवहार, १९३३. |
| ६८. सरदेसाई गो.स. | मराठी रियासत उग्रप्रकृती संभाजी, १९३५ |
| ६९. ----------- | सरदेसाई, ऐतिहासिक घराण्याच्या वंशावळी, १९५७. |
| ७०. ----------- | येसूबाई, नवयुग, ७ मे १९१७ |
| ७१. ----------- | मराठी रियासत, पूर्वार्ध |
| ७२. साने, का.ना. (संपा.) | चित्रगुप्त विरचित शिवाजी महाराजांची बखर, ४ थी आवृत्ती, पुणे १९२७. |
| ७३. ----------- | काव्येतिहास संग्रह, ऐतिहासिक पत्रे, यादी, वगैरे |

७४. ------------ शिव छत्रपतींचे चरित्र, कृष्णाजी अनंत सभासद विरचित, १९२७

७५. ----------- मल्हार रामराव चिटणीस विरचित शिव छत्रपती महाराज यांचे सप्त प्रकरणात्मक चरित्र, १८८९.

७६. सबनीस के.गो.(संपा.) पंत अमात्य बावडा दप्तर. भा. १

७७. राजवाडे वि.का. मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड १-२६

७८.------------ ऐतिहासिक साधने, खंड २,३,८,१५

७९. ----------- खंड ८ (जयसिंहाच्या छावणीत)

८०.राजवाडे वि.का. चित्तपावनांची सामाजिक मूळ पीठिका.

८१.------------ ऐतिहासिक प्रस्तावना, खंड १-३

८२. ----------- (संपा.) भारतवर्ष मासिक, पर्व १. प्रतिनिधीची बखर.

८३.रामदास रामदासी श्री समर्थ संप्रदायाची कागदपत्रे, भाग ९, शके १८३७.

८४. हेरवाडकर र.दि. (संपा.) सप्त प्रकरणात्मक चरित्र चिटणीस विरचित

८५. हरदास बाळशास्त्री छत्रपती शिवाजी, भाग ३.

८६. भावे वि.ल. (संपा.) अफजलखानाचा वध अथवा शिवाजी महाराजांचा पहिला पराक्रम (आज्ञापत्र), १९२१.

८७. ------------ मराठी दप्तर, रुमाल १-३



## परिशिष्ट १ ले

## महाराणी येसुबाई यांनी स्वत:च्या शिक्क्यासहित काढलेल्या आज्ञा

### चाफळ - उपाध्ये

लेखांक ६७ ] १६०८ फाल्गुन वद्य ११ [ अस्सल मोडी

रघुनाथ

श्री स
सखी राज्ञी
जयती

. तीर्थस्वरूप दिवाकर गोसावी

ई कौलनामे सौभाग्यवती राजश्री बाईसाहेब दामदौलतहु बजा-नींय' मुकाम स्थळ चाफळ का नाणेघोल सु॥सबा सन हजार १०९६समानैन अलफ दिल्हे अभयेपत्र ऐसे जे श्री देवाची यात्रा आली आहे यात्रेत लोक यावयास अनमान करीताती की आपले लोक दौडी करून यात्रेस तसवीस देतील ऐसीयास अभयेपत्र अलियाने + + + + + + + + देवाचा मोहछाये करीतील ह्मणौन हुजूर मालूम जाले त्यावरून यात्रेस अभेयपत्र दिल्हे आहे. आमचे तर्फेने कोणी वाटे जाणार नाही गावोगावी कागद पाठऊन यात्रकरी बोलाऊन श्री चा समारंभ करणे आमचे अभेये असे व मौजे मजकुरांचे सीगणवाडी श्री चे इनाम स्थळ आहे जैसे सालाबाद चालिले आहे तेणेप्रमाणे आपले ही पत्र पाहिजे ह्मणौन राजश्री माधव गोसावी यानिं सागीतले तेरी आमचे ही अभयेपत्र आहे देवाचे इनाम स्थळ तुमचे अध्येन आहे आमचे तर्फेने आजार लागणार नाही मार्तब सुद देवाचे प्रसाद पाठवीला तो आह्मास पावला मो

मोर्त
ब सुद

तेरीख २४ माहे रबिलाखर

---

*॰ शिक्का अस्पष्ट आहे. खात्रीपूर्वक लागला नाही. १ "यात्रकरी येतील" असे शब्द असावेत. कागद अगदी फाटला आहे. २.आधीन

## परिशिष्ट ३ रे

## औरंगजेबाच्या कैदेत छावणीत असताना श्रीदेव, चिंचवड यांचे सेवेसी लिहिलेले पत्र

# राजमाता येसुबाईवरील कठिण प्रसंग

---***********---

हे पत्र मातुश्री येसूबाई साहेब (म्हणजे संभाजी महाराजांच्या पत्नी) अहमदनगरच्या किल्यांत कैदेत असतां श्री देव, चिंचवड, यांस लिहीले आहे. त्या वेळी येसूबाई साहेबांची फार हलाखीची स्थिती झाली होती. संकटाचा परिहार व्हावा या हेतूने त्यांनी चिंचवडकर देवांकडे पत्राद्वारे धाव घेतली आहे. (वार्षिक इतिवृत्त शके १८३७ पृ.२९८)

॥ श्रीशंकर १६२७

वै. शु. ७

राजश्री श्री देव स्वामीचे सेवेसी

॥ श्रीमत् परमपूज्य तपोनिधी मुक्तिदायक सकलगुणालंकरण देव वरदमूर्तीपरायण राजमान्य राजश्री

आज्ञाधारक सेवेसी मातुश्री येसूबाईसाहेब दोनी करकमल जोडून चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंती. उपरी, येथील क्षेम तागाईत वैशाख शुध सप्तमी गुरूवार जाणऊन मुकाम अहमदनगरीं दुर्गांत स्वामींच्या आशीर्वादेंकरून यथास्थित असे स्वकिय कुशल-लेखन-आज्ञा केली पाहिजे. विशेष. बहुत दिवस जाले. स्वामींनी आशीर्वादपत्र पाठवून बालकाचा परामर्श केला नाहीं. याकरितां चित्तास स्वस्थता होत नाही. तें देव जाणें. तरी स्वामींनी येणारा मनुश्या बरोबरी प्रतिक्षाणीं आशीर्वादपत्र पाठवीत गेलें पाहिजे. विशेष. आमचे वर्तमान तरी स्वामीपासी सत्यच लेखन केलें पाहिजे. चिरंजीव दाजी तो पृथ्वीपतीसमागमें गेले. आम्हांस सार्वभोमाची आज्ञा झाली कीं 'अहमदनगरास जावें.' आज्ञाप्रमाणें आम्हांस अहमदनगरास घेऊन आले. तेथें आलियावरी आजी पांच मास जाले.

परंतु खर्चाची बहुत तंगचाई जाली. काय निमित्य तरी सार्वभोम दूर गेले. आमचा तनखा जो दिल्हा तेथें ताम्रांनीं व हरिभक्तांनी व कांही काळानें करून प्रतिकूल जाली, यामुळें द्रव्य येणें राहिलें. येथें अहमदनगरीं साहुकारांचे पाच सात सहस्त्र ब्रम्हस्व जाले. आतां कोण्ही देत नाहीं. मागिल्या च पैकियास तगादे लाविले आहेत. त्यामुळे बहुत कष्टी होतों. तो दुःखसागर स्वामीस काय म्हणऊन ल्याहावा ? स्वामीच्या सेवेसी रायाजी जाधव पाठविला असे. तरी महाराज कैलासवासी स्वामी गेल्या तगाईत आपणावरी हा कसला प्राप्त जाला. इंगळास वोळंबे लागले. बरे होणार भविष्य त्यास यत्न काय आहे ? आतां एक स्वामीच क्लेश परिहार करितील. इतराच्यानें कांहीं होणें नाहीं. तरी सारांश गोष्टी कीं ब्रम्हस्वा पासून मुक्त केलियानें बहुत कीर्ति स्वामीची आहे. आणि पाऊसपाणी जालियावरी स्वामी ज्या पासून देवितील त्यास प्रविष्ट करून. परंतु हा समय आम्हांवरी कठीण पडला आहे. आपले कोणी येथें प्रतिपक्षी नाहीं ऐसा प्रसंग प्राप्त जाला आहे. याचें निवारण करणार स्वामी आहेत. माझी उपेक्षा केली न पाहिजे. वरकड चिरंजिवाकडील सामराज व आमचें वर्तमान रायाजी मुखांतरी चरणापाशीं विनंती करिता शृत होईल, ते सत्यच मानणे. विशेष ल्याहावें तरी आपण अज्ञान, मूढ असे. लिहीतां येत नाही. अथवा ज्ञान हि नाहीं. त्याहि वरी आपणाजवळीं कोण्ही शाहाणा कारकून नाहीं. आवाक्षराची क्षमा केली पाहिजे. कृपा आशीर्वाद निरंतर करीत गेले पाहिजे. कृपा आसो दीजे. जाणिजे मो

सेवेसी सेवक बसवंताने चरणावरी मस्तक ठेऊन सां दंडवत विनंती उपरी लि परिसिजे. मी सेवक असे. आशीर्वाद पायीत जाणें. जाणिले हे विनंती.

**रा। छ ११ माहे मोहरम सन ४९ हे विज्ञापना.**

---

## परिशिष्ट ४ थे

## औरंगजेबाच्या कैदेत छावणीत असता महाराणी येसुबाईंच्या नावाचा केलेला फार्सी शिक्का

**पांचवा**--शिक्का अधेली एवढा वाटोळा, तीन ओळींचा आहे. (१)गौस गुलाम (२) शेख मिरान (३) सन १०७१ एवढा मजकूर ह्या शिक्कयात आहे. हि. १०७१ म्ह.इ.१६६१, श.१५८३ हा काल येतो.

**सहावा** --फार्सी शिक्का लहान रुपयाएवढा पूर्ण वाटोळा, तीन ओळींचा, दुवलयी आहे. ह्यांचे महत्त्व दोन दृष्टींनी आहे. (१) एसूबाई (२) वालिदए साहू (३) राजह् सने आहद. ह्या मजकुराचा अर्थ 'राजा साहूची आई एसूबाई तिची ही जुलूस सन एकमध्यें केलेली मुद्रा. ह्या मुद्रेस अनुसरून गु. राजवाडे यांनी आपल्या म.इ.सा.खंड २ मध्ये (मूळ मजकूर) पृ. १९ ते २३ ह्या पृष्ठांवर चर्चेसाठी हाच उद्‌धृत करून चर्चा केली आहे. राजवाडे ह्यांनी ह्या शिक्क्याचा कालहि इ.स. १७०७ असा उद्‌धृत केला आहे. ह्या शिक्क्याचे जे थोडेसें महत्त्व-येसूबाईच्या नावाचा शिक्का का करावा लागला- ते लक्षांत घेतां, कळून येतें. शाहू व त्याची आई यांना कांही परिवारासह जेव्हां इ.स. १६८९मध्यें औरंगजेबाच्या छावणींत आणण्यांत आले तेंव्हा युद्धांत पाडाव करून आणलेले पण कांहीं अधिकार देऊन व प्रतिष्ठेनेंच वागविण्याजोगे हे राजापौत्र असल्यामुळें ह्यांतील मुख्याला-शाहूला-हप्तहजारी-पदराचा सरदार केले. पुढें मदनसिंघासहि कांही अधिकार दिला व त्याचाहि शिक्का करून अंमलदार केले. पण औरंगजेबाच्या मृत्यूनंतर सर्वच घडी बदलली. आणि एकट्या शाहूस फक्त साडण्याचा विचार झाला. अर्थात् पूर्वव्यवस्था तीच पण त्या व्यवस्थेचा अधिकारी बदलला तन्निदर्शक ही येसूबाईची मुद्रा झाली. औरंगजेब इ.१७०७ च्या फेब्रुवारींत मृत्यु पावला व अजमशहा पातशहा झाला. ह्या अवधींत म्हणजे फेब्रु.२१ ते मार्च १२ ह्या अवघ्या २० दिवसांत औरंगजेबाच्या तिन्ही मुलांनी आपण गादीनशीन झाल्याचे जाहीर केले. म्हणजे आपापला जुलूस सन चालू केला. तेव्हां येसूबाईच्या शिक्क्यांतील 'जुलूस एक' म्हणजे नेमका कोण्या पातशहाजाद्याचा हें सांगणे कठीण. पण 'शाहू अजमशहास औरंगाबादेस भेटतो' इ. जरी उल्लेख आढळले तरी येसूबाईच्या शिक्यांतील जुलूस बहादूरशहा शहाअलमचा असावा. नुसत्या शिक्याचा विचार आणि तो शिक्का उठविलेल्या पत्रासह विचार अशा दोन्ही प्रकारें विचार होणें इष्ट. असों.

## परिशिष्ट ५ वे

## मर्यादा श्री सखी राज्ञा जयती यांसंबधी उल्लेख

## महाराष्ट्रेतिहासकालांतील राज्यकारभाराचा अभ्यास

देशमूख, सरदेशमूख ह्यांना मुद्राधिकार आहे व त्यांच्या मुद्रा आहेत. देशपांडे यांस मुद्राधिकारही नाहिं. पण एका देशपांडे बाईंनी वतनी कारभार तर चोखपणे, पुरुष काय चानविल इतका चांगुलपणाने, धैर्यानें केला; इतकेच नव्हे तर मुद्राधिकार अजिबात नसतांना मुद्रा करविली व तींत आपले नांवही कोरविले व मुद्रांकित होऊन कागदपत्रें होऊ लागली. पण लगेच आक्षेप घेतला गेला व ती मुद्रा रद्द करविली. सारांश, स्त्रियांनी कारभार करावा, पत्रें लिहावी, लिहवावीं पण त्यांना मुद्राधिकार नाहीं. पट्टाधिकार स्वतंत्रपणे नाहीं तर मुद्राधिकार कोठून असणार ? पण त्यांना 'मर्यादामुद्रा' मात्र आहे.

स्त्रियांची 'मर्यादामुद्रा' पुरुषांच्या मर्यादामुद्रांहून वेगळी आहे. मर्यादामुद्रा म्हणजे काय हे आपण प्रारंभी माहित करून घेतले आहे. लेखनाच्या समाप्तीस, येथे पत्रमर्यादा झाली' असे सांगणारी मुद्रा ती मर्यादा-मुद्रा, ती समाप्ति मुद्रा. ह्याप्रमाणेंच स्त्रियांच्या मर्यादामुद्रांमधील मजकूर असूनहि शिवाय तत्कालीन राजस्त्रियांचा उल्लेख करण्याची जी शिष्टमान्य प्रथा होती त्या प्रसि अनुसरून ह्या स्त्रियांच्या मुद्रेत त्यांचा निर्देश केलेला असे. इतिहासकालीं राजस्त्रियांचा उल्लेख 'धनीण', 'थोरली धनीण', 'धाकटी धनीण', थोरली देवडी', 'धाकटी देवडी', तसेंच 'थोरला अथवा पहिला 'वाडा','महाल' ह्याप्रमाणे स्थलविशेषाने त्यांचा उल्लेख येतो. बायकांची यादी देतांनाहि 'वाडा १ ला, वाडा २ रा, सौभाग्यवतीं जिजाबाईसाहेब तोरगळकर शिंदे यांची कन्या वाडा ३ रा' अशी लिहिण्याची रीत होती. यादीचे शीर्षकहि 'जनानखानियाचे वाडियाची नांवनिसी' असें आहे.

स्त्रियांचा, त्यांच्या स्थळविशेषावरून निर्देश करण्याची प्रथा आपल्या प्राचीन संस्कृति दृष्ट्याहि संमतच आहे. अमरकोशांत राजस्त्रिवाचक शब्द सांगतांना 'स्त्र्यगारं भूभुजामन्त:पुरं स्यादवरोधनं । शुद्धान्तश्यावरोधश्च' असे चार शब्द सांगितले आहेत. ह्यांत स्थलविशेषाप्रमाणें गुणविशेषाचेहि तीन शब्द आहेत. अन्त:पुर म्हणजे महाल, वाडा. धनीण ही संज्ञा ठीक आहे. पण 'महाल, वाडा, देवडी,' हे शब्द लक्षणेनें ह्या अर्थाचे झालेले आहेत. प्रत्यक्ष वाक्यामधून सुद्धां हेच शब्द योजून कार्यभाग स्पष्टपणे लक्षात येईल म्हणजे यावा अशी अपेक्षा केली आहे. इचल. इति ले. १८० मध्यें 'वाडा ४ यांस भाद्र

शु.१२ गुरुवारीं पुत्रोत्सव जाहला. शर्करा पाठविली आहे' असें आले आहे. राम. राम. डोमगांव मठाचे कागदांत (ले.४४९) 'दरूनीमहाल वाडा पहिला' यांनी पत्रें करून इनाम देविलें. पेद भा. १३ ले. १३ पृ. १५ वर स्वामी 'महाल' माघारा येत तों जेजुरी सासवड प्रांते रहाणार, असे बाजीरावाचें चिमाजी अप्पांस पत्र आहे. (इ.१७२८ ऑक्टो. ३०) खं.८ ले. १६८ मध्यें 'राणीवसा चौथा वाडा' ह्यांनी विनंती केली, असे आले आहे. सारांश ह्या प्रमाणें राण्यांचे उल्लेख पत्रांतून येत असल्यामुळें मर्यादामुद्रांतहि 'चौथा वाडामोर्त बसुद' अशी द्वादश बुरुजी कोल्हापूरकर जिजाबाईंची मुद्रा आहे. मुद्रेंत 'चवथा वाडा' हे शब्द आले आहेत. थो.संभाजी छत्रपति ह्यांच्या येसूबाईची ही 'मर्यादा' 'श्री सखी राज्ञी जयति' अशी दिलेली आहे. तसेंच मुधोळकर घोरपडे घराण्यात बाकाबाईची मर्यादा 'राम सीता' अशी आहे. मुधोळकर घोरपडे राजघराण्याचे दैवत श्रीराम हें आहे. त्यांच्या सर्व मराठी मुद्रांतून 'रामनामा'चा निर्देश आदराने व आवर्जून केलेला असतो. अर्थात त्याच घराण्यांतील ह्या बाईंच्या मर्यादामुद्रेंत रामाचा उल्लेख सीतेसह केलेला आहे. घोरपडे पुरुष 'रामाचा' निर्देश करतात., स्त्री 'रामासह सीतेचा' निर्देश करते, व ह्या प्रकारें ही स्त्री-मर्यादामुद्रा आहे हे ओळखता येतें. तात्पर्य, स्त्रियांना नाममुद्राधिकार नाहीं, मर्यादामुद्राधिकार आहें व त्या मुद्रांमधून 'वाडा, राजपत्नी' किंवा 'स्त्रीदैवत' ह्यांचा निर्देश असतो. देशमुखी मुद्रेंत मकाबाई भोसल्यांची मुद्रा आहे.

घोरपडे राजघराण्यापुरतें येथेंच हेंहि प्रसंगाने सांगतो कीं, त्यांच्या मुद्रांतून प्रारंभ तरी 'श्रीराम' ह्या दैवतोल्लेखाने असला तरी शेवटीं 'अदिलशाही' 'औरंगशाही' हेंहि लिहिलेलें आहे. मुद्रांमध्यें येसुबाईंची मुद्रा पुढे दिली आहे. ती फारसी.

## परिशिष्ठ ६ वे

# मराठवाडा विद्यापीठात आढळून आलेले महाराणीसंबंधी काही अप्रकाशित साहित्य.

## मूळ मोडी असलेल्या मजकुराचे भाषांतर

राजाराम साहेब पनाल्यास गेल्यावरी पुढे चंदीस गेले हे कथानक याचेच करकर्ण आहे त्यात लिहीले असे रायगडी शाहूराजे राहीले याजवरी हबसी येऊन वेढा घातला त्याजवरी दुलसुकएखाण ही आले किलेकरी यांनी जुणें माचेयावरी पडणे इत्यादी करणे ते केलीच सा महीणे आहमहीणे किला भांडवीला परंतू बाहेरून कुमक यावी तरी राजारामसाहेब चंदीस गेले योगेशहभारी परीणाम नाही ते समई सर्वानी विचार केलीयावरी येसूबाई साहेब बोलकी आसे सांपडलो म्हणजे आधीच आजीग त्यांत दैपी चांगले नाही तेंव्हा तुलपुकरखाणाचाच आश्रय करावा

मसलत सर्वा विचारे करून तुळपुकर खाणान यासी राज करण केले त्यात बेगमेसही निरोप पाठविला तेंव्हां तिचे अस्वासन आणुन आणुन व तुळपुकर खाणाचा या राज्याचे ठाई आंतः कर्णापासून ममता होती ते समई त्याज पासून शतक्रिया घेऊन हाराचास नेऊन तुळपुकर खाणाचे मांडीवरी बसविले याचे वडिलाचीते माती चुलतेली सोडून गेले सर्वविसी वडील तुम्ही म्हटल्यावरी त्यानी ही येविसी याज ऊपरी तुम्ही खतरा न करणे याचे जिवास आवरूस कदापी धका लगु देणार नाही असे फारच आदरे बोलून शाहूराजे व मदनसींग जाट कंसोलेचे- पोटी हे होते व येसूबाई साहेब व आणखी जाट कसाला एक दोन होत्या त्या घेऊन तुलपुकर खाण पादशा कडे निघोला गेले किलाखालीकरून आपले त्यानी लोक वरते घातले दुजे लोक वगैरे यास ऊपद्रव हरएकविसी न केला याज प्रो. करून शाहुराजे यास पादशाकडे सु। येथे होऊन जाऊन भेट करविली केली

(मागील मजकुर)

शाहुराजे संभाजीचे लेक आणीले हे वर्तमान बेगमेस कळली यावरी तेच समई पादशाहास अर्ज केला कीं, माझा मोठा .... याज विसी पादशाचा याज ऊपरी दुसरा विचार नसावा म्हणुन बोलून त्याचे आस्मान घेऊन माहाराजास आपले भेटीस नेले जवळ बसऊन फारच प्रतीयुक्त बोलून येसूबाई साहेब व जे गेली सर्व त्यास आवरूनी जसी ठेवणे उचित तसीच पादशा

इमलीत ठेविली. खर्चाखी बेगमी शागीर्द पेशा वगैरे येथे योग्य नेमून देऊन ठेविले. बेगमेनी फारच माया राजावरी प्रती करावी. ऐक दो दिवशी जवळ नित्य न्यावे असे करून केवळ पुत्रच असे यावे यासी ममता धरु लागली.

## लेखिकेचा परिचय

### मीना मिराशी

**जन्म** : १७.११.१९२८

**पत्ता** : २४, 'मधूसदन', नंदादीप सोसायटी, गोविंदनगर, स्टेशन रोड, औरंगाबाद

**शिक्षण** : कर्वे मॅट्रिक - १९४५

नागपूर मॅट्रिक - १९५५

इंटरमिजिएट - नागपूर युनिव्हर्सिटी - १९५७

इतिहास विषयात प्रथम क्रमांक

डॉ. हिरालाल जैन मेमोरियल पारितोषिक

बी. ए. - नागपूर युनिव्हर्सिटी - १९५९

एम. ए. - नागपूर युनिव्हर्सिटी - १९६२

पीएच. डी. - मराठवाडा युनिव्हर्सिटी - १९८४

विषय : महाराणी येसूबाई

**व्यवसाय** : १९६२ ते १९७७ श्रीमती बिंझाणी महिला विद्यालय, नागपूर येथे इतिहास विषय प्रमुख प्राध्यापक.

औरंगाबाद येथील ज्ञान-विज्ञान महाविद्यालयात महाराष्ट्र शासनातर्फे आयोजित शैक्षणिक शिबिरात निबंध वाचन.

नागपूर आणि औरंगाबाद आकाशवाणीवर अनेक विषयांवर भाषणे.

मराठवाडा, तरुण भारत इत्यादी दैनिकांतून अनेक लेख प्रसिद्ध.

**कॉन्टिनेन्टल प्रकाशित**
**काही संग्राह्य इतिहास ग्रंथ**

**पेशवे घराण्याचा इतिहास** : प्रमोद ओक

*मराठ्यांचा युद्धेतिहास* : ब्रिगेडियर के. पित्रे

*भारताचा शोध* : पं. नेहरू
अनुवाद : साने गुरुजी

*प्राचीन भारताचा सांस्कृतिक इतिहास*
ब. ग. राहूरकर - रं. ना. गायधनी

*खानदेशचा इतिहास* : टी. टी. महाजन

*महाराष्ट्र-संस्कृती* (सांस्कृतिक इतिहास)
डॉ. पु. ग. सहसबुद्धे

*उमाजी राजे - मुक्काम डोंगर* (चरित्र)
सदाशिव आठवले

# महाराणी येसूबाई

छत्रपती शिवाजी महाराजांची ज्येष्ठ सून, संभाजी महाराजांची महाराणी आणि प्रजाजनांचे आदरस्थान, अशा महाराणी येसुबाईंच्या जीवनात जेवढी संकटे आली तेवढी राजघराण्यातील कोणत्याही स्त्रीवर आली नसावीत. एवढे सर्व राजवैभव असूनही आयुष्यात दुर्दैव त्यांच्या पाठीशी लागले आणि सुमारे तीस वर्षे मराठ्यांच्या या महाराणीला शुत्रच्या बंदीवासात जीवन कंठावे लागले.

पण येसुबाईंनी ज्या धैर्याने आणि कणखर वृत्तीने त्या खडतर जीवनाला तोंड दिले, त्याला इतिहासात तोड नाही. भोसले घराण्यात सून शोभेल असेच त्या शेवटपर्यंत वागल्या.

येसुबाईंची मान्यता मोठी होती या थोर स्त्रीबद्दल मराठमंडळात मोठा पूज्यभाव होता. अशा आदर्श महाराणींचे हे चरित्र. अनेक भगिनींना कार्यकर्तृत्वाची व अतुल निर्धाराची प्रेरणा देईल.

---

कॉन्टिनेन्टल प्रकाशन
विजयानगर, आंबील ओढा
पुणे ४११ ०३०